ग्रंथसंपादक व प्रसारक मंडळीची ग्रंथमाला.
ग्रंथ १४ वा.

# प्याद्याचा फर्जी,

अथवा

# भोंसले घराण्याचा अभ्युदय.

हें पुस्तक

नारायण कृष्ण गद्रे
'अक्षविपाक' नाटकाचे कर्ते
यांनीं लिहिलें.



प्रकाशक,
दामोदर सांवळाराम आणि मंडळी,
बडोदें आणि मुंबई.

मुंबईत,
"इंदुप्रकाश" छापखान्यांत छापिलें.

सन १८९९.

किंमत एक रुपया.

# प्रस्तावना.

पुढील दीडदोनशें पानांत १६ व्या शतकांतील आपल्या देशाच्या स्थितीचें अगदीं संक्षिप्त आणि ओबड-धोबड चित्र रेखाटण्याचा यथाशक्ति प्रयत्न केला आहे. प्रत्यक्ष गोष्टीचा काळ १५९० पासून १६०० पर्यंतचा आहे. यांत इतिहासास कोठेंही रेसभर न सोडतां कादंबरीच्या रूपानें वर्णन करण्याचा प्रयत्न केला आहे, तो कितपत साधला आहे हें मर्मज्ञ पाहतीलच. या दिशेनें प्रथम प्रयत्न आहे, तेव्हां त्यांत दोष पुष्कळ असणार हें प्रस्तुत लेखक जाणून आहे. तथापि जेवढा आढळेल तेवढाच गुणलव वाचकहंस घेतील अशी आशा आहे.

मित्र रा. रा. मुकुंद बाळकृष्ण गुर्जर बी. ए. यांनीं केलेल्या अनेक उपयुक्त सूचनांबद्दल ग्रंथकर्ता त्यांचा अत्यंत ऋणी आहे, तसेंच मे. दामोदर सांवळाराम आणि मंडळी यांनीं हें पुस्तक प्रकाशित करून महाराष्ट्रियांपुढें आणिलें याबद्दल त्यांचेही येथें उपकार मानणें अवश्य आहे.

सर्वांचा नम्र सेवक,

ना. कृ. गद्रे.

मुंबई, १०-१२-९९.

# प्याद्याचा फर्जी.

सुमारें तीनसवातीनशें वर्षें होऊन गेलीं. त्या वेळेस या आमच्या दक्षिण देशांत विधर्मी व विदेशी मुसलमान लोकांची सत्ता होती. उत्तरेस तर याच्याही अगोदरच दोनशें वर्षें त्यांची सत्ता दृढतर झाली होती. दक्षिणेंत विजयानगरच्या वीरांनीं या विदेशी टोळधाडीस बराच अडथळा केला होता. सरासरी सबंद चवदावें आणि पंधरावें शतक व अर्धेंअधिक सोळावें शतक ह्मणजे जवळजवळ पावणेतीनशें वर्षें विजयानगरकरांनीं महंमदीयांशीं चांगला विजयी झगडा चालविला होता ह्मणण्यास कांहींएक हरकत नाहीं. परंतु शेवटीं दुर्दैवानें १५६५ सालांत विजयानगरकरांस कायमची हार खावी लागली, आणि दक्षिण देशाचें स्वातंत्र्य पार नष्ट झालें. तिकडे उत्तरेसही विजयानगरकरांप्रमाणें हिंदुत्वाचा खराखरा अभिमान एक चितोडवाल्यांनीं कायमचा जीवंत ठेवला, आणि मोंगलसैन्यमहार्णवाच्या लाटांस कित्येक शतकें सारखा अभेद्य बंधारा घातला. तथापि घरफूट ही नेहमीं घुशीप्रमाणें स्वातंत्र्यप्रासादास कोरीत राहून, शेवटीं त्याला जमीनदोस्त करिते, तीच स्थिति जयपूरकरादि सर्व रजपुतांनीं, आपल्या जातीस, धर्मास, आणि नांवालौकिकास झुगारून देऊन, 'माझ्यासारखी कधीं होशील' असल्या नीचपणाच्या इच्छेनें चितोडकरांवर आणली. याप्रमाणें सर्व हिंदुस्थानांत या वेळीं यवनी मातली होती. स्वातंत्र्यसूर्यास

खग्रास ग्रहण लागलें होतें. हिंदुधर्म रसातळास चालला होता. जिकडे तिकडे महंमदी 'दीन' गाजत होता. महंमदीयांची समशेर स्वयंप्रकाश सूर्याप्रमाणें जिकडे-तिकडे सारखी चमकून राहिली होती. भरतखंडांतील त्रैवर्णिकांस त्यांच्या त्या तरवारीस नमन करावें लागत होतें, आणि त्यामुळें एक वेळ त्या आकाशस्थ सहस्त्ररश्मीस अर्घ्य देणें चुकलें तर चालेल, इतकेंच नव्हे. तर त्यास अर्घ्य देणें ह्मणजे पाप करणेंच होय; परंतु या मुसलमानांच्या कराकाशांतील धूमकेतुरूपी खड्गास रोज ताज्या आणि पवित्र रक्ताचें अर्घ्यदान करण्याकरितां निमूटपणें भारतीयांस आपल्या माना त्यांच्यापुढें वांकवाव्या लागत होत्या. असा त्या वेळचा आह्मां हिंदूंचा पवित्र धर्म बनला होता! मद्यमांसानें आणि रक्तार्घ्यानेंच कायती संतुष्ट होणारी ती महमदीयांची कराल-करवाल-देवी जर संतुष्ट राखावयाची, तर स्वमानार्पणावांचून तेथें दुसरा इलाजच नव्हता. ह्मणून स्वधर्म राखावयाचा तर प्राणाची पर्वा उपयोगाची नाहीं, प्राणाची पर्वा असेल तर धर्म बुडणार, अशा प्रकारें 'इकडे आड इकडे विहीर' अशी स्थिति या हतभाग्य व गरीब हिंदु लोकांस त्या वेळीं आली होती. केव्हां काय प्रसंग येईल याचा बिलकुल अंदाज नसे. यमधर्म तर इतका रागावला होता कीं कांहीं विचारूं नका. त्याच्या क्रोधाच्या शमनार्थ रोजचीं किती गोप्रदानें लागत याची कांहीं गणतिच नाहीं. सहस्त्रावधि गाई रोजच्या रोज त्याला बळी द्याव्या लागत. तरी त्याचें कधीं समाधान हें नाहींच. शिवाय त्या यमधर्मानें आमच्यावर रागावून आपलें वसतिस्थान मुसलमानांच्या विजयी खड्गांत केलें होतें; त्यामुळें त्या

खड्गाच्या मध्यस्थीनें हीं सर्व गोप्रदानें करावीं लागत. अज्ञ जनांस, 'गाय आपली केवळ माता,' तेव्हां तिला विधर्मी लोकांच्या खड्गास अर्पावयाची ह्मणजे, अतोनात दुःख होई. त्रैवर्णिकांपैकीं क्षत्रियवैश्यांनीं तर कित्येक पिढ्या उपनयन टाकल्यासारखेंच केलें होतें, ह्मणून रागावूनच कीं काय त्या उपनयनानें सुतेचें उग्र स्वरूप धारण केलें होतें. ब्राह्मण हे सर्व वर्णांचे गुरु; त्यांनीं क्षत्रियवैश्यांकडून आपला मान राखविला पाहिजे होता, तो न राखविल्यामुळें त्यांच्या-वर तर त्या उपनयनाचा अतिच राग झाला होता; आणि आपल्या सुतेच्या नवीन उग्र स्वरूपानें तें त्यांची वारंवार भेट घेऊं लागलें होतें. अशी सर्वतोपरी घडी अगदीं उलटी झाली होती. अद्वैताची सर्वत्र फत्ते होऊन लोक त्याच्या भजनीं लागलेले न आवडून द्वैत अगदीं चिडून गेलें होतें; व तें आपला लोकांवर फि-रून पगडा बसवावा ह्मणून जे नानाविध प्रयत्न आज कि-त्येक शतकें सारखें चालवीत होतें, तें सर्व आज पूर्ण फ-ळास आले होते; आणि जिकडे तिकडे 'आठ भय्ये आणि नऊ चुली' या प्रकारची स्थिति या हिंदुस्थानांत सर्व वर्णांत, सर्व जातींत आणि सर्व प्रांतांत झाली होती. श्रीमच्छंकरा-चार्यांनीं अद्वैत सिद्धांताचा लाभ सर्व जगास करून दिला, परंतु तो त्यांच्या अनुयायांनीं, आपणच सर्व पटकावून इतर सर्व लोकांस द्वैत आणि असमाधान यांच्या तावडींत दिलें, त्यामुळें 'नाथांच्या घरची उलटीच खूण' या न्यायानें, या आपमतलबी अद्वैत्यांची, त्यांनीं केलेल्या अपहाराबद्दल, खो-डकी मोडण्याचें काम ईश्वरानें द्वैतास सबल करून पार

पाडण्याची योजना केली होती असें दिसतें. यामुळें साधु-संतांस फारच जाच होऊं लागला. त्यांची फार खडतर कसोटी होऊं लागली. एतावता अतिशूद्रापासून तों तहत ब्रह्मीभूत साधूपर्यंत, रंकापासून तों रावापर्यंत, सर्व आबाल-वृद्धांना या फिरलेल्या परिस्थितीपासून अतोनात त्रास आणि पराकाष्ठेचें दुःख सोसावें लागत होतें. गेली घटका ती आपली, येणारी कशी येते कोण जाणे? याप्रमाणें प्रत्ये-काला सारखा हृद्रोग लागून राहिला होता. त्यांत मग ज्याच्या त्याच्या अकलेप्रमाणें, ज्ञानाप्रमाणें, धैर्याप्रमाणें आणि जाति, धर्म, कुल, ग्राम, देश व राष्ट्र यांच्या अभिमानाप्रमाणें, असलेल्या स्थितीशीं बऱ्यावाईट रीतीनें जो तो झगडत होता. कोणी 'आलिया भोगासी असावें सादर' याचा आदर करून धर्माच्या उग्र स्वरूपास उजू बळी पडत, आणि त्याची कृपा संपादन करीत. कोणी भिऊन त्याला टाळीत आणि आपलेंच रूपान्तर करून घेत ह्मणजे धर्मांतर करीत. असा सर्वत्र एकच घोंटाळा माजून राहिला होता. आमची गोष्ट अशा काळाची आहे. आमचा नायक या सर्व अडचणींस आणि घोटाळ्यास धैर्यानें तोंड देऊन त्यांतून आपली व आपल्याबरोबर आपल्या लोकांची चांगल्या तऱ्हेनें मुक्तता करण्यास झटणारा असा आहे. तेव्हां त्याचें नांव, गांव आणि पूर्वपीठिका इत्यादिकांकडे आपण आतां वळूं. देउळगांव, जिंती, खानवटें, वेरूळ इत्यादि मुसलमानी अंमलांतील कांहीं गांवांची पाटिलकी या वेळीं एका अस्सल क्षत्रिय कुळाकडे होती. या घरा-ण्याचें आडनांव भोंसले असें होतें. ते चाळून पाळून

आपल्या पाटिलकीच्या एकेका गांवीं राहत. तथापि देउळगांव व वेरूळ या दोन ठिकाणीं ते जितके राहत असत तितके इतर ठिकाणीं राहत नसत. या क्षत्रिय कुलांतील लोकांच्या बाह्यस्वरूपांत फारच फेरफार झाला होता. त्यांच्या हातांतील धनुष्य, तरवार हीं जाऊन त्यांच्या जागीं नांगर, आसूड हीं आलीं होतीं राजवैभवाची व त्यांची कायमचीच फारकत झाली होती. तथापि या कुलांतील सर्व लोक, आपद्धर्मन्यायानें त्यांतल्या त्यांतही जितकें स्वधर्मव्रत चालवितां येईल तितकें चालवावें, अशा कलाचे आणि कृतीचे होते. इतिहासाच्या आद्यकालापासून तों आपल्या कथानकाच्या काळापर्यंत या कुलांतील नरवीरांनीं आपल्या या प्रिय मायदेशास आणि सनातन सद्धर्मास कित्येक वेळां, किंबहुना बहुतेक सर्व खडतर प्रसंगीं, परकीयांच्या जाचापासून मुक्त करून फिरून स्वातंत्र्यामृताचें निर्भय व आतृप्ति पान करविलें होतें. प्रथम त्रेतायुगांत अयोध्येस राजपीठ चालवून मनुष्यमात्रास पीडा करण्यास उत्पन्न झालेल्या दुष्ट रावणप्रभृति राक्षसांचा समाचार घेतला आणि भूभार कमी केला, तो याच पवित्रतम कुळांतील आद्य पुरुषांनीं. त्या हकीकतीचें अत्यंत बोधप्रद आणि ज्ञानद असें वर्णन वाल्मीकि महामुनि यांच्या प्रासादिक रामायणांत वाचलें असतां राष्ट्रभक्ति कशी असते आणि तिचा उगम कोठें व कसा होतो हें चांगलें कळेल. फिरून कौरवपांडवी झाल्यावर उज्जनीस विक्रमादित्य ह्मणून प्रसिद्ध शककर्ता ज्या कुळांत झाला तेंही हेंच सुपवित्र कुळ. त्यानंतर गुर्जर भूमीस झालेला यवन लोकांचा वगैरे असह्य भार नाहींसा करून

वल्लभीपुरास भट्टारक नांवाचा राजवंश चालू करणारा पुरुष ह्याच पवित्र कुलांत जन्म पावलेला. पुढें आठव्या शतकांत प्रथम झालेली महंमदीयांची प्रमार राजावरील जंगी स्वारी परतवून, चितोडास, त्या गोष्टीचें केवळ स्मारक ह्मणून, आपली गादी स्थापन करणारा बाप्पा रावळ-ही याच सूर्यवंशाचा अंकुर होय. तिकडे नेपाळांत 'वीरविक्रम समशेरजंग बहादुर' ह्मणून जो राजवंश, आज कित्येक शतकें अकुतोभय नांदतो आहे तोही याचाच एक फांटा होय. चितोडची गादी अजूनही मुसलमान लोकांच्या तडाक्यांतून जी राखली गेली, तीहि त्याच पराक्रमी वंशाच्या स्वकुलदीपक पुरुषांच्या प्रचंड दोर्दंडप्रभावानें आणि आतांच वर दर्शविलेल्या अत्यंत खडतर परिस्थितींतून या आपल्या प्रिय महाराष्ट्रास पार पाडण्यास कायावाचामनें झटणारा जो भोंसले वंश तोही याच सूर्यवंशवृक्षाची एक जबरदस्त शाखा होय. वृक्षामध्यें वटवृक्ष, त्याचप्रमाणें क्षत्रियवंशांत हा सूर्यवंश अतिविस्तृत, अखंड आयुष्य आणि अनंत शाखा धारण करणारा होय.

अशा या पवित्र आणि विक्रमशाली वंश वटाची एक पारंबी प्रसंगानें या महाराष्ट्रापर्यंत येऊन बहुतेक जमीनदोस्त झाल्यानें अज्ञातवासांत दिवस काढीत होती. ती वर येण्यास केवळ अनुकूळ काळाची वाट पाहत होती इतकेंच नव्हे, तर आपल्या नैसर्गिक जोमानें वर येण्याकरितां शक्य तो प्रयत्नही आपल्याकडून तिनें ईश्वर स्मरून चालविला होता. आणि या वेळेस मागें सांगितल्याप्रमाणें ह्या शाखेंतील पुरुषांनीं स्वप्रयत्नानें चारपांच लहानमोठ्या गावांची पाटिलकीही संपादन केली होती. या वेळेस या

घराण्यांचा बाबजी या नांवाचा मुख्य कर्ता पुरुष असे. बाबजीस आणखी कांहीं भाऊ वगैरेही होते. या घराण्यास, हे दक्षिणेंत उतरले तेव्हांपासूनच, भोंसले हें आडनांव मिळालें होतें. चितोडास पद्मिनीसंबंधानें जो इतिहास-प्रसिद्ध आणि प्रत्येक हिंदुमात्रास मुसलमानी अंमलाच्या अमानुष क्रूरपणाची आणि राजपुतान्यांतील सिसोदे कुळा-तील रजपुतांच्या स्वराष्ट्र आणि स्वधर्म यांच्या प्राणापेक्षांही ज़ास्त प्रीतीची एकसमयावच्छेदानें आठवण करून देणारा जोहार झाला, त्या वेळेस सज्जनसिंह या नांवाचा जो इसम, वंशांकुर नाहींसा होऊं नये ह्मणून, राजपुत्र भीमसिंगा-च्या अत्याग्रहामुळें आपल्या इच्छेविरुद्ध चितोड सोडून रानांत जाऊन राहिला होता, त्याच्यापासून या भोंसले वंशाची पुढें उत्पत्ति झाली. असो; बाबजी या वेळीं देउळगांवांस राहत असे. त्याचा कुटुंबविस्तार बेताचाच तरी असल्या गरीब स्थितींत जरा भारींच असा होता. मल्हारभट्ट या नांवाचा एक ब्राह्मण पंडित कुलगुरु ह्मणून त्याच्यापाशीं असे. हे मल्हारभट्टबावाही चितोडांतील राज-सभेंतील परंपरागत चालत आलेल्या पंडितवंशापैकींच होते. त्यांच्या कुटुंबाचाही सर्व भार बाबजीवर होता हें निराळें सांगण्यास नकोच. हे बावा मोठे विद्वान, खरे खरे वेदशास्त्रसंपन्न आणि स्वामिकार्यदक्ष असे असत. बाबजीस मालोजी व विठूजी असे दोन पाठोपाठचे मुलगे असत.

हीं दोन्हींही मुलें जात्याच हूड व चपल असत. त्यांच्या दुर्दैवानें त्यांस पितृसुख फार दिवस लाभलें नाहीं. मुलें कर्तीसवरतीं होऊन विश्रामाचे दिवस पाहण्याचें बाबजीच्या दैवीं नव्हतें. कारण तो, मालू विठू सहा चार वर्षांचे असतां-

नांच कैलासवासी झाला. त्यामुळें कुटुंबाचा सर्व भार पाटलीणबाईवर पडला. मुलें तर हीं अशीं हूड आणि अगदीं अल्लड, केवळ अर्भकेंच ह्मटलें तरी चालेल. गडीमाणसें, बैल, गुरेंढोरें, यांचा हा सर्व पसारा त्या एकट्या अबलेनें आवरावयाचा, असा दुर्धर प्रसंग तिजवर येऊन पडला. तथापि तिनें तो जबरदस्त संसाराचा गाडा, धीरानें आणि मोठ्या करारानें उभा ठेवून, हीं दोन्हीं मुलें मोठीं होऊन तो चालता करण्यास समर्थ झालीं ह्मणजे त्यांच्या हवालीं करण्याचा आपला दृढनिश्चय ढळूं दिला नाहीं. ती आपल्या दोन्ही मुलांस नेहमीं उत्तम प्रकारचा बोध करीत असे. आपल्या कुळाचा मागील इतिहास, तिला जितका माहीत असे तितका, हळूहळू त्यांच्या कानावर घालून, त्यांच्या मनांत पूर्वजप्रीति, स्वाभिमान, स्वकुलाभिमान, स्वजाति आणि स्वधर्म यांबद्दलची योग्य कळकळ इत्यादि गुण त्यांच्या अंगांत यावे ह्मणून नेहमीं ह्मटत असे. त्याचप्रमाणें आपण मूळचे अस्सल क्षत्रिय असून दक्षिणेंत, आपणांस आपलें मूळचें राजस्थानांतील संस्थान सोडून, कोणत्या बिकट प्रसंगानें यावें लागलें, तो बिकट प्रसंग आपणांवर कोणीं दुष्टांनीं आणला, आणि त्याचे भयंकर परिणाम आपणांस व आपल्या लोकांस किती प्रकारें भोगावे लागत आहेत, या गोष्टींशीं ती माउली, आपल्या मुलांची जितकी ओळख तिच्यानें पटवितां येणें शक्य होतें, तितकी पटवीत असे. तिचा उपदेश दोघांही मुलांस सारखाच असे. दोन्ही तिचीं पोटचीं मुलें. प्रत्यक्ष त्यांची आईच ती; तिला एक अधिक आणि दुसरा कमी हा भावच नाहीं. उलट मङ्ग

मुलांवर आईची प्रीति जास्त असते आणि त्याला ती कोणतीही गोष्ट जास्त कळकळीनें सांगते सवरते, असा नियम आहे. त्यास अनुसरून या दोघांपैकीं विठूजी जरा मालोजीच्या मानानें मठ्ठ असे ह्मणून त्याच्याकडे तितक्याच मानानें तिचें लक्ष जास्त ओढत असे. असें असतांही मालोजीच्या ठिकाणीं जें त्या माउलीच्या बाळकडूचें कार्य झालेलें दृष्टीस पडत असे, तें विठूजीच्या ठिकाणीं कांहीं दिसूं नये. प्रथम प्रथम हा फरक फार थोडा, अगदीं न कळण्यासारखा होता. तथापि त्यांच्या वयाबरोबरच तो वाढत जाऊन बराच स्पष्ट दिसूं लागला. एकच शिक्षक अनेक विद्यार्थ्यांच्या वर्गास एकच शिक्षण देतो; परंतु अधिकारभेदानें प्रसंगीं एक त्या शिक्षकासही वंद्य होतो आणि दुसरा, त्याला कधीं कोणीं शिकविलें होतें किंवा नव्हतें याप्रमाणें अगदीं कोराच्या कोरा राहतो, त्याच नियमास अनुसरून हीं मुलें प्रौढ होण्याच्या अवकाशांत त्यांच्यांत पुष्कळच अंतर पडलें. एकाचा स्वकुल स्वजाति आणि स्वधर्म यांबद्दलचा अभिमान आणि स्वपराक्रमानें स्वतंत्र यश संपादण्याची आवड इतकी वाढत चालली कीं, त्या विचारानें त्याला घरचा कामधंदाही सुचूं नये; आणि दुसऱ्याची प्रवृत्ति आहे त्यांतच समाधान मानून आपल्या संसाराची मांडणी सरासरी आपल्यापुरती नीट सुव्यवस्थित झाली, ह्मणजे आपली इतिकर्तव्यता आटोपली, अशा प्रकारची. त्याची ही कोती समजूत इतकी दृढ होऊन बसली कीं आपला दादा हा आपल्या कुळंबाव्याच्या कामांत आपल्या आईच्या जितका हुकमी उपयोगी पडावा तितका तो पडत नाहीं असें त्यास वाटे, आणि हें दादाचें वर्तन केवळ उ-

डाणटप्पूपणाचें आणि आळसाचें आहे, अशा समजुतीनें तो त्याचा मनांतून थोडाफार द्वेषही करावयास लागला. इकडे मालोजी, ह्मणजे पहिला, आपला भाऊ विठूजी शेतकीच्या हलक्या कामांतच सारखा चूर होऊन राहतो, त्याला आपल्या क्षात्रधर्माची कांहींच चाड नाहीं, कांहीं मोठेपणाचीही हाव नाहीं, त्याची कितीही समजूत पाडण्याचा यत्न केला तरी फुकट जातो अशाबद्दल उलट, त्याची, तो अजून लहान आहे, अल्लड आहे असें ह्मणून, कींव मात्र करीत असे; आणि मनापासून त्याला आपल्या भावाच्या या स्वभावाबद्दल मोठें वाईट वाटत असे. परंतु द्वेषाचें वारें देखील त्याच्या मनास कधीं शिवत नसे.

वाचकांनीं ताडलेंच असेल, आणि नसेल तर आह्मी या ठिकाणीं स्पष्ट सांगतों कीं, आपल्या या गोष्टीचा नायक ह्मणजे वरील मालोजी हा होय. त्याचेंच चरित्र या कथानकांत गोंवण्याचें योजिलें आहे. कथानकाचा काळ, स्थळ आणि परिस्थिति हीं वाचकांस या प्रकरणांत कळलींच आहेत. असल्या परिस्थितींतून आमच्या नायकानें आपलें डोकें वर काढलें आहे; आणि तेंही अशा तऱ्हेनें कीं पुढल्या पिढीनें आपलें स्वातंत्र्य कसें मिळवावें याची तीस चांगलीच ओळख पटवून व त्या दुर्गम कामांत तीस लागणारा वाटाड्याही स्वतांच तयार करून ठेवून ! आतां आमच्या हातून हें त्या महाभागाचें चरित्र कितपत वठेल आणि लोकांना तें कितपत बोधप्रद होईल हा भाग स्वतंत्र आहे. तें वठावें तसें वठलें नाहीं तर तो दोष आमचा व आमच्या लेखणीचा होय. त्या दोषास आपला नायक मुळींच पात्र नाहीं. असो. प्रथम केवळ बिनजोर असून स्वबुद्धिबळानें फर्जी झालेला हा मालोजी भोंसले ह्मणजे मराठ्यांतील बिनमोल रत्नच होय.

## प्रकरण २ रें.

—: o :—

बाबजी पाटील ऊर्फ राजे वारले, त्या वेळीं मालू विठू हीं दोन्हीं मुलें केवळ सहा व चार वर्षांचीं होतीं असें मागल्या भागांतच सांगितलें आहे. त्याचप्रमाणें बाबजीच्या मागें त्याची बायको किती धीरानें संसार चालवीत होती, व ह्या आपल्या मुलांनीं पुढें कांहीं तरी नांवारूपास यावें ह्मणून तिची किती उत्कट इच्छा असे, त्याप्रमाणेंच ती मुलांस तसेंच उदात्त वळण घालून देत होती, वगैरे गोष्टींचाही मागें उल्लेख आलाच आहे. पंडित मल्हारभट्ट बावा यांजकडे तिनें या मुलांचें लेखनवाचन व स्वधर्म-श्रवण आणि व्यावहारिक नीतिशिक्षण सोंपविलें होतें. या दोघां मुलांत मालोजी फारच चपल, अतिहूड आणि विलक्षण पाणीदार असा होता. शिवाय त्याची बुद्धिही फार तीव्र असे. धारणाशक्ति तर अगदीं लोकोत्तरच होती. ह्मणून पंडितजींस वाटे कीं याला आपण हा शिकेल तितकें शिकवावें. विठूजीही कांहीं केवळ ढ नव्हता. तथापि थोरल्याच्या मानानें मंदच. हीं दोन्ही मुलें दहाआठ वर्षांचीं झालीं नाहींत तोंच रामायणमहाभारतांतील कित्येक कथा त्यांस अगदीं बिनचूक सांगतां येत असत. पाटलीणबाईस पुराणश्रवणाची अत्यंत आवड. सांगणारा मल्हारभट्ट बावासारखा चतुरस्त्र पुराणिक. श्रोते मालू विठू-सारखे तरतरीत. मग काय विचारतां? रोज त्या पुराणास नवाच रंग येत असे. पुराणांत कधीं चाणाक्यनीति तर कधीं कामंदकी, कधीं विदुरनीति तर कधीं यक्षप्रश्न, कधीं योगवासिष्ठ तर कधीं श्रीमद्भगवद्गीता, कधीं मनुस्मृतींतून

क्षात्रधर्म तर कधीं आपद्धर्म, कधीं बृहत्कथासागरांतील कथानक कधीं दशकुमारचरित्रांतील गोष्ट, कधीं शालिवाहन-विक्रमयुद्धकथा तर कधीं कनकसेन भट्टारक यांच्या वल्लभी-पुरच्या राज्यप्रकरणीं गोष्टी, कधीं वनराजचावडे सिद्धराज जयसिंह यांच्या गोष्टी, तर कधीं बाप्पारावळ, सामरसी, पद्मि-नी, उम्मीर वगैरे सिसोदे कुलावतंस राजपुरुषांच्या व पराक्रमी स्त्रियांच्या हृदयद्रावक गोष्टी, त्याचप्रमाणें कधीं विजयानगरकरांचे ताजे पराक्रम तर कधीं संगराणा वगैरेंच्या गोष्टी, चितोडचे जोहार इत्यादि अनेक प्रकार मल्हारभट्ट बावा या आपल्या बालश्रोत्यांस मोठ्या कळक-ळीनें आणि हौसेनें सांगत असत. त्या गोष्टींचीं तात्पर्यें मुलांच्या मनावर चांगलीं ठसावीं ह्मणून निरनिराळ्या प्रकारांनीं ते त्यांस त्या गोष्टींतील वेंचक मुद्यांचे प्रश्न करीत व त्यांजकडून त्या गोष्टी फिरून अथपासून इतिपर्यंत काढून घेत असत. ह्या प्रकारानें या मुलांचें शिक्षण चालत असतां त्यांच्या मनास उत्तम संस्कार घडला, आणि त्यांच्या विचारांसही चांगलें क्षात्रकुलोचित वळण लागलें.

असो. या मल्हारभट्ट बावांची संगतिही या मुलांस फार दिवस लाभली नाहीं. याचें कारण मूलपीठिका येथें जर सविस्तर सांगूं ह्मटलें तर फारच विस्तार होईल. तथापि ती हकीगत येथें थोडक्यांत दिली असतां अप्रासं-गिक होणार नाहीं. हे मल्हारभट्ट बावा या आमच्या क्षत्रकुलावतंस राजकुलाचें अगदीं दैवतच होतें. या घराण्या-च्या अष्टप्रधानकीचा सर्व मान या एका पुरुषाकडे होता. उदेपुरास आपल्या यजमानांच्या वतीनें कांहीं खटपट

करण्यास यांनीं अनेक खेपा केल्या होत्या. हे मोठे राजनीतिकुशल असत. बाबजी राजे यांस फिरून आपण उदेपूरच्या राज्यांत कांहीं तरी भाग मिळवून देऊन त्यांच्यावर फिरून मोर्चेले वारलेलीं पाहूं अशी यांस फार महत्वाकांक्षा असे. परंतु दुर्दैवानें यांच्या भगीरथ प्रयत्नासही या कामीं कांहीं यश आलें नाहीं; व बाबाजी राजे यांचा केवळ पाटिलकी करण्यांतच अंत झाला, यामुळें ते फार उदास असत. यांच्या त्या राजकारस्थानीपणाचा परिणाम असा झाला कीं, त्यांस शेवटीं यवनांच्या प्रतिबंधांत दिवस काढावे लागले. नेहमीं यांचीं कारस्थानें चाललेलीं असत, व त्यांत अनेक खेकटीं उत्पन्न होत. उदेपुराकडील खटपटीनें हे हिंदुस्थानांतील राजपुरुषांच्या पूर्ण ओळखीचे झाले होते. दक्षिणेंतही यांचा दरारा आणि वचक पुष्कळच असे. तात्पर्य काय कीं विषमकाळामुळें कोणीं दुष्टांनीं यांच्याबद्दल यवनांस कांहीं भलतीसलतीच बातमी दिली आणि त्यांचा परिणाम, एक दिवस अचानक हे घोड्यावर बसून एकटेच कांहीं कामानिमित्त प्रवासांत असतां यवनांच्या स्वारांनीं त्यांस पकडलें आणि ठाणेदारानें त्यांस कैदेंत टाकिलें. झालें, तेथेंच त्यांचा अंत झाला. मालूविठूंस या पंडितजींचा अतिच लळा होता. पाटलीणबाईस तर आपलें छत्रच नाहींसें झालें असें वाटून फारच दुःख झालें. कोणत्याही अडचणीच्या प्रसंगांतून निभावून नेणारा आपल्या कुटुंबाचा एक पाठिंबा गेलेला पाहून कोणास बरें वाईट वाटणार नाहीं? तिनें त्यांच्या मुक्ततेकरितां आपल्या शक्तीबाहेरही द्रव्य वगैरे खर्चण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं. परंतु कांहीं इलाजच चालेना. इकडे हीं दोन्ही मुलें तिला

अगदीं भंडावून सोडूं लागलीं. तीं रोज तिला शंभरदां विचारीत कीं पंडितजी कोठें गेले आहेत? ते यावयाचे केव्हां? त्यांना बोलावूं कां नाहीं धाडीत तूं? आह्मांस सांग, आह्मी जाऊन त्यांना घेऊन येतों. अशा हजार प्रश्नांनीं ते तिला अगदीं सळो कां पळो करून सोडीत. तिच्या मनांत यांना शास्त्रीबुवा ( पंडितजी ) कैदेंत पडले आहेत ह्मणून सांगावयाचें नव्हतें. तिला वाटे कीं हीं व्रात्य मुलें कांहीं भलतेंसलतेंच करावयास जातील, आणि न जाणों दुसरीच एखादी घोरपड गळ्यांत घेतील. मल्हार-बुवांचा मुलगा लक्ष्मणभट्ट हाही मोठा विद्वान असे. तो तरुणच होता. तथापि ह्या मालूविठूंपेक्षां पुष्कळ मोठा होता. त्याचें लग्न वगैरे झालें होतें. त्यानेंही पाटलीण-बाईच्या सल्लयानें व इतरही हरप्रयत्न करून आपल्या बापास बंधमुक्त करण्याकरितां शक्य तितकी हालचाल केली. परंतु सर्व व्यर्थ. यांसही मालूविठू पंडितजी ह्मणूनच हाका मारीत असत. त्यांची ह्मणजे लक्ष्मणभट्टांचीही, मल्हारभट्ट बावांबद्दल सारखी चौकशी करून, या दोघां मुलांनीं अगदीं पाठ पुरविली. शेवटीं पाटलीणबाई व लक्ष्मणभट्ट यांचे गौप्यरक्षणाचे सर्व प्रयत्न फुकट जाऊन कर्णोपकर्णीं ती बातमी या दोघांही मुलांस लागली. प्रत्यक्ष पित्या-प्रमाणें प्रेम करणाऱ्या आपल्या गुरूजीची ही अशी व्यवस्था झालेली ऐकून त्या दोघांही राजबिड्यांस मनस्वी खेद झाला. त्यांना फार अवघड वाटलें. तसाच त्यांना, ते जरी केवळ बाल होते तरी, अतिशय क्रोध आला. त्यांना वाटलें कीं असेंच्या असें जाऊन त्या मुसलमान ठाणेदाराची दाढीच उपटावी, नाहीं तर आपल्या शेतांतले चांगले चांगले दहा-

बीस जवानपठ्ठे बरोबर घेऊन मल्हारपंडितांस जेथें अटकेंत ठेविलें होतें त्या ठिकाणावर हल्ला करून त्यांस सोडवून आणावें. आपले हे अल्लड विचार घरींदारीं वाटेल तेथें बेदरकार ते बाहेर मोठ्या आवेशानें दांतओंठ चावून बोलूनही दाखवीत असत. पाटलीणबाईस त्यांना आवरतां आवरतां आणि त्यांची समजूत घालतां घालतां अगदीं पुरेसें झालें. लक्ष्मणभट्टांस त्यांचें तें आवेशाचें बोलणें ऐकून मोठें कौतुक वाटत असे; व कित्येक जण तर मनापासून या आपल्या छोट्या धन्यांच्याबरोबर जाऊन त्या तुरुंगावर खरोखर हल्ला करण्यासही राजी होते. ही अल्लड सेना लक्ष्मणभट्टांस व पाटलीणबाईस वारंवार त्रास देऊं लागली. शेवटीं लक्ष्मणभट्ट एकदांचे, त्यांना मी रदबली करून सोडवून आणतों अशी थाप देऊन, व आपणास ह्या कामास पांचसहा महिने तरी लागतील असें सांगून तेथून दुसऱ्या गावीं जाऊन राहिले. असो! तात्पर्य काय कीं या एका गोष्टीनेंच त्या मुलांच्या कोंवळ्या व शुद्ध हृदयांत यवन लोकांबद्दल असा कांहीं तिटकारा व अनादर उत्पन्न झाला कीं कांहीं विचारूं नका. त्यांत मालोजीस तर विशेषच. त्याच्या मनांत तर या यवनी बादशाहीविषयीं पुरेंपुरें हाडवैरच या घटकेपासून कायमचें रुजलें. आतां त्या हाडवैराचा अविचारानें कधींही अवेळींच स्फोट झाला नाहीं, याला कारण आपद्धर्मादि अनेक विषय मल्हारपंडितांनीं त्याच्या मनावर ठसविले होते, त्यामुळें तो पुढें जसजसा मोठा होऊं लागला व त्याला जगाचा अनुभव येऊं लागून आपली व आपल्या मंडळीची खरोखर अन्तर्बाह्य स्थिति किती अडचणीची आहे हें

त्याच्या लक्षांत येऊन, जेव्हां त्याच्या प्रयत्नाची दिशा कायमची ठरली, तेव्हां त्याचे हे सर्व लहानपणचे अल्लड विचार जागच्याजागीं राहिले, व देशकालपरिस्थितीप्रमाणें योग्य त्याच धोरणानें तो आपल्या विचारनौकेचें सुकाणूं सहज विवेकबळानें इष्ट दिशेस फिरवूं लागला. या अल्लड परंतु सात्विक व शुद्ध विचारांचा या असल्या लहान वयांतही मालोजीच्या वर्तनावर इष्टच परिणाम घडून आला. त्याच्या त्या मुग्ध मनाला, कां वगैरे कांहीं कळत नव्हतें तरी, शरीरसंपत्तीचें फारच महत्व वाटूं लागलें. आणि त्या धोरणानें त्याचे प्रयत्नही सुरू झाले. मात्र, या प्रयत्नांस तूर्त माकडचेष्टांच्या पलीकडेस कांहीं एक ह्मणतां येण्यासारखें नव्हतें.

मुलेंच तीं! तेव्हां मोठ्या माणसांस सुद्धां आजन्मसंगतीच्या प्रियवस्तूंची आठवण जसजसा त्यांच्या व त्या वस्तूंच्या वियोगाचा काळ वाढत जातो तसतशी कमी कमी होत जाते अथवा तें दुःख अंगवळणीं पडून त्यांतील कठोरता परिचयानें नाहींशी होते, त्याप्रमाणेंच मल्हारभट्टांची आठवणही या मुलांना कमीकमीच होऊं लागली. तथापि ती अगदीं बुजाली असें कधींच झालें नाहीं. इकडे लक्ष्मणभट्टांनीं महत्प्रयासानें आपल्या प्रिय पित्याची तुरुंगांतच एकदां भेट घेतली व त्यांस कोणीं केव्हां, कोठें आणि कां पकडलें याबद्दलचा खुलासा विचारून घेतला. त्यांत त्यांला कोणीं केव्हां कोठें या तीन प्रश्नांचीं उत्तरें यथास्थित मिळालीं; परंतु चवथ्या 'कां' या प्रश्नाचें मात्र कांहींच उत्तर मिळालें नाहीं. कारण आपणांस कां कैदेंत टाकिलें आहे याचा मल्हारपंडितांसच मुळीं

कांहीं मागमूस लागला नव्हता. मल्हारपंडितांनीं चिरंजीवांस ' आपण कैदेंत पडल्याबद्दल आपणांस मुळींच दुःख वाटत नाहीं, तर आपल्या यजमानाचें कार्य आपल्या हातून कांहींच झालें नाहीं याबद्दल मात्र आपणांस फार वाईट वाटतें.' असें सांगून 'तूं आतां माझी आशा सोड. मला इतकेंच वचन दे कीं यावज्जीव यजमानाच्या मुलांच्या कल्याणार्थ मी झटेन. ह्मणजे मी या तुरुंगांतच पण सुखानें मरेन. मला हा बंदीवास माझ्या इहजन्मींच्या कोणत्याही वाईट कर्माबद्दल प्राप्त झाला नसून हें माझें केवळ पूर्वजन्मार्जित कर्मफळ आहे. इहजन्मीं मीं कोणतेंही दुष्कृत्य केल्याचें मला स्मरत नाहीं. मीं आपलें सर्व आयुष्य आपल्या वेदशास्त्रपठणरूप स्वाध्यायांत, ब्रह्मकर्मांत आणि आपले लौकिक यजमान बाबजी राजे यांच्या एकनिष्ठ सेवेंत न्याय्यानुवर्तनानें घालविलें आहे. आपले यजमान आपणांस फार चांगल्या रीतीनें मानीत असत. ते थोर कुळांतील क्षत्रिय होते. त्यांचीं मुलेंही शुद्ध खाणींतील स्वयंप्रकाश रत्नेंच आहेत. मालू हा असाधारण बुद्धीचा मुलगा असून लोकोत्तर कर्तृत्वाचा निपजेल. रक्षाव्रत अग्नीप्रमाणें केवळ अनुकूल काळ येतांच हींच यःकश्चित पाटलाचीं ह्मणविलेलीं मुलें पुढें चांगलीं नांवारूपास येतील. त्यांना जप. त्यांच्या उत्कर्षाचा मार्ग शोधण्यास तूं आपलें बुद्धिसर्वस्व खर्च कर. ते आपले अन्नदाते आहेत. त्यांचें कल्याण तेंच आपलें कल्याण. त्यांचा लौकिक तोच आपला. त्यांच्या मोठेपणानें आपण सहजच मोठेपणास चढूं. त्यांच्या कुलाच्या उत्कर्षावरच आपल्या कुलाचा उत्कर्ष अवलंबून आहे. आज त्यांच्या कुलाची खरी माहिती दक्षिणेंत या महाराष्ट्रांत फारच थोड्यांना आहे. त्यामुळें

त्यांचे शरीरसंबंध योग्य कुळांशीं होण्यास त्यांच्या गरीबीमुळें बरीच अडचण पडेल. याकारितां कुलोपाध्याय, कुलगुरु, गुरुबंधु वगैरे सर्व नात्यांनीं त्यांचे शरीरसंबंध मुख्यत्वें उच्च कुलांशींच घडवून आणावयाचें काम आतां तुझें आहे. जाधव निंबाळकर वगैरे सत्क्षत्रकुलें जीं या महाराष्ट्रांत कांहीं आहेत त्यांपैकींच एखाद्या घराण्यांतील सुंदर शहाणी धोरणी गुणी व विनयसंपन्न अशी मुलगी निवडून काढून योग्य वयांत मालूचें व तसेंच पुढें विठूचेंही लग्न करण्याची जबाबदारी आतां तुजवर आहे. त्याचप्रमाणें त्या थोर मनाच्या पाटलीणबाईस हरएक बाबतींत योग्य निरपेक्ष सल्ला देऊन जिकडून तिला माझी आठवण न होईल असें कर. मी यजमानांच्या हितचिंतनांत सुखानें राहीन. मला तुरुंग काय व घर काय सारखेंच आहे. ईश्वर सर्वत्र आहेच आहे. त्याला अनन्यशरण गेलेल्यास दुःख शिवतही नाहीं. इत्यादि मागील निरवानिरवीच्या व समाधानाच्या पुष्कळ गोष्टी सांगितल्या.

**लक्ष्मणभट्ट**:—आपल्या ह्मणण्याप्रमाणें अक्षरशः वर्तन करीन, त्याबद्दल आपण यत्किंचित्‌ही काळजी करूं नये. परंतु पाटलीणबाईस व त्या मुलांस आपणावांचून अगदींच करमत नाहीं. त्याचप्रमाणें घरांत आईनें तर बहुतेक अन्नही वर्ज केल्याप्रमाणेंच आहे. माझी अवस्था तर अशी होते कीं आपण जीवंत असून आपल्या वडिलांस यवनांच्या, विधर्मीयांच्या, कैदेंत कुचंबूं देण्यापेक्षां बेहत्तर मरण आलें तरी, परंतु वडिलांच्या सुटकेसाठीं प्रसंगीं शिर हातावर घेऊनही यत्न करावा; अथवा आपण त्यांच्याबरोबरच त्यांच्या सेवेकरितां बद्ध होऊन राहावें हें बरें.

मल्हारभट्ट:—हें तुझें ह्मणणें तुझ्या पितृवत्सलतेस अनुरूप असेंच आहे. तथापि या जगांत प्रत्येक पुरुषास स्वत:बद्दलचें अथवा स्वत:च्या कुटुंबाबद्दलचें कर्तव्य असतें, त्याचप्रमाणें जनतेबद्दलचेंही कर्तव्य उचण्याचा बोजा त्याच्या माथीं असतो; आणि त्याच न्यायानें माझ्यासंबंधी किंवा आपल्या कुटुंबासंबंधी कर्तव्यास झटण्यापेक्षां यजमानाच्या कुटुंबाच्या कल्याणाची चिन्ता वाहून अहर्निश तें साधण्याकरितां झटणें हें तुझें कर्तव्य जास्त महत्वाचें आहे, आणि तें तूं माझी आज्ञा ह्मणून बजावलें ह्मणजे मी कृतार्थ झालों व तूंही कृतार्थ झालास. कारण आपण ब्राह्मण काय एका अर्ध्या कुटुंबाचें कधीं काळीं पालन करणारे. परंतु क्षत्रियांची तशी गोष्ट नाहीं. त्यांना जर कर्तव्यदिशा योग्य रीतीनें दाखवून दिली, तर त्यांच्यांत सर्व भूमीचें पालन करणारे पुरुष निपजण्याचा संभव असतो. चारी वर्णांचें संरक्षण आपल्या बाहुबलानें करून देवधर्म यांचें रक्षण करणें त्याचप्रमाणें वर्णाश्रमधर्म चालविणें हीं क्षत्रियांचीं स्वभावकर्में होत. तीं त्यांस करावयास लावणें, योग्य प्रसंगीं त्यांस योग्य सल्लामसलत देणें, नीती अनीती समजून सांगणें व त्यांच्या छत्राखालीं आपला ब्राह्मणाचार व वैदिक कर्में यांचें निरपेक्ष पालन करणें हाच आपला ब्राह्मणाचा धर्म. प्राणही जाण्याची जरी वेळ आली तरी तोच श्रेयस्कर आहे. इहलोकची वस्ती बोलूनचालून क्षणभंगुर! तिच्या पाशांत गुंतून स्वधर्मरक्षणानें, स्वस्वामीच्या एकनिष्ठ सेवेनें व ईश्वरचिन्तनानें प्राप्त होणारें परलोकींचें शाश्वत सुख दवडणें हें शहाणपण नव्हे. तेव्हां जा, आपल्या आईची समजूत घाल. तिळा माझी अशी

आज्ञा आहे ह्मणून सांग कीं तिनें मजकरितां यत्किंचितही दुःख करूं नये. मी येथें आनंदांत ईश्वरनामसंकीर्तन करून आहें. जा, पाटलीणबाईचें शान्तवन कर. मालू-विठूंस आपला ळळा लाव. त्यांना माझ्याप्रमाणेंच नित्य त्यांच्या योग्य शिक्षण दे. मालू खचित खचित आपल्या उभय कुळांचे पांग फेडील.

अशा रीतीनें त्या बापलेकांचा पुष्कळ संवाद झाला. लक्ष्मणभट्टांस बापास सोडून येणें फार अवघड वाटलें. तथापि त्या मानधन ब्राह्मणानें मुलाची समजूत घालून आपल्या बायकोच्या समाधानाकरितां एक लांबलचक ब्रह्मज्ञानपर पत्र लिहून तें आपल्या चिरंजीवाजवळ दिलें, आणि शेवटीं त्याला फिरून आपल्या घरीं परतविलें. जसा समक्ष उपदेशाचा पुत्राच्या मनावर, तसाच त्याच्या पत्राचा त्याच्या बायकोच्या मनावर योग्य तोच परिणाम झाला. मल्हारभट्ट बाबांस फार दिवस त्या बंधनांत काढावे लागले नाहींत. कारण त्या कडकडीत ब्राह्मणास तेथील अन्नादिकाचा मुळीं विटाळच! ते फक्त कधींबिधीं ठाणेदाराच्या परवानगीनें पहारेकऱ्यांनीं आणून दिल्यास दूध व शुद्ध फळें यांचा मात्र आदारार्थ स्वीकार करीत असत. रोजची स्नान-संध्या व त्यांचें जपजाप्य तर दिवसेंदिवस वाढतच चाललें. ते प्राणायाम ध्यान धारणा यांतच मग्न व्हावयास लागले व दिवसाचे दिवस योगसाधनांत घालवूं लागले. त्यांना लहान-पणापासूनच योगाभ्यासाची आवड असे व योग्य गुरू-कडून त्यांनीं योगाची सर्व प्रक्रिया चांगलीच साध्य करून घेतलेली होती. शेवटीं चार महिने अशा तऱ्हेनें गेल्यावर त्यांचा प्रायोपवेश करण्याचा निश्चय ठरला, व त्यांनीं आपला

तो संकेत आपल्या मुलास कळविण्याची तजवीज केली. अशा रीतीनें या महात्म्याचा अंत झाला, व पुढील सर्व व्यवस्था त्यांच्या इच्छेनुरूप त्यांच्या मुलानें ह्मणजे लक्ष्मणभट्टांनीं केली. त्यांच्या मरणानें पाटलीणबाईस, मालूविठूस त्याचप्रमाणें सर्व गांवकऱ्यांस किती दुःख झालें तें सांगण्यांत कांहीं अर्थ नाहीं. त्याची वाचकांनींच कल्पना केली असतां बरें. लक्ष्मणभट्टजींस तर पितृशोकानें कांहीं महिने भ्रमिष्टच करून सोडिलें होतें.

---

## प्रकरण तिसरें.

—:0:—

शाळू दिवसांची अखेरी. सकाळीं थंडी मी ह्मणणार. दुपारीं कडक ऊन आहेच. याच दिवसांतील चित्राच्या उन्हानें हारिणांच्या—काळविटांच्या—पाठी काळ्या पडतात. संध्याकाळीं फिरून मंद शीतल वारा सुटावयाचाच. देशावर जिकडे तिकडे शाळूचीं पिकें अगदीं कापणीस आलीं आहेत. कित्येक ठिकाणीं गहूहरभराही अगदीं जोमास आलेला आहे. ऊसही बागाइतांत आहेच. मोघण ह्मणून टाकलेल्या कोथिंबीर ओंवा वगैरेस फुलें आलीं असून बागाइती शेताचा देखावा ह्मणजे जशी एक अप्रतिम मेजवानीच डोळ्यास होऊन राहिली आहे. अग्रधान्याचीं रिकामीं वावरें अगदीं काळींभोर असून दुरून पाहणारांस केवळ काळी मखमालच हंतरल्यासारखी वाटत आहे. रात्रीं आकाश स्वच्छ व निरभ्र असल्यामुळें स्वच्छ पिठाप्रमाणें पडणाऱ्या चांदण्याचा देखावा तर इतका नयनमनोहर व उल्हासदायक असतो कीं त्याला उपमाच नाहीं. अशा एका रात्रीं

मालोजी आपल्या शेतांतील खळ्यावर अगदीं एकटाच बसला होता. जवळपास चिटपांखरूंही फिरकत नव्हतें. गडीमाणसें सर्व भाकरतुकडा खाऊन बैलांना वैरणकाडी पाहून आपापल्या झोंपडींत जाऊन स्वस्थ निजलीं होतीं. एकंदरींत जिकडेतिकडे अगदीं सामसूम झालें होतें. मालोजी आकाशाकडे टक लावून परंतु आपल्याशींच कांहीं विचार करीत अगदीं स्वस्थ बसला होता. इतक्यांत एक चांगला तेजस्वी तारा उत्तरेच्या बाजूनें एकदम सुटून खालीं जमीनीकडे बराच जवळ येऊन पडल्याचा मालोजीस भास झाला, ह्मणून तो जास्तच टक लावून आकाशाकडे, हा काय चमत्कार आहे अशा विचारी मुद्रेनें पाहूं लागला, तों एकामागून एक थोडक्याच वेळांत आणखी अनेक तारे पडले. तारकापात हें दुश्चिन्ह आहे असें त्यानें कधीं ऐकिलें होतें, आणि कांहीं पुण्यवान आत्म्यांस आकाशांत ताऱ्यांचीं स्वरूपें मिळतात असेंही लहानपणीं ऐकिलें होतें. आतां या दोहोंचा मेळ कसा घालावा हें एक आमच्या रावांना मोठेंच गूढ पडलें. “ जर हे पुण्यात्मे होत तर ते खालीं पृथ्वीवर आल्यानें या मृत्युलोकांत त्यांच्यापासून सत्कृत्येंच घडलीं पाहिजेत आणि सुजनांस सुखच मिळालें पाहिजे, आणि मग हा तारकापात अरिष्टसूचकच कसा ? हं बरोबरच ! अन्यायवर्ती जनांस अरिष्टसूचकच खरा हा तारकापात! कारण हे महात्मे त्यांचा अन्याय उघडकीला आणितील आणि त्यापासून त्यांचें सहजच नुकसान होणार; व त्यांचें नुकसान ह्मणजे तदितर गरीब, न्यायवर्ती सुजनांचें कल्याण. अलीकडे हे मुसलमान लोक या देशाचे राजे होऊन प्रजेला नाहीं नाहीं तशी पीडा देत आहेत,

यांच्या त्या जुलमाचा प्रतिकार आमच्या हातून यत्किंचित्-
ही होत नाहीं. तसा त्यांचा प्रतिकार करण्याचें आमच्यांत
त्राणच राहिलें नाहीं. आणि घटकाभर एखाद्याला तशी
हिम्मत असली तरी त्याला सहाय्याच्या नांवानें अवळ्या-
येवढें पूज्य. ईश्वरा हे महात्मे तूं कशाकरितां बरें खालीं
लोटून देत आहेस ? दयाघना, हे महात्मे सर्व आमच्या
लोकांतच अवतार धारण करोत ! ह्मणजे हे ज्या ज्या
कुलांत उत्पन्न होतील तीं तीं कुलें तरी सन्मार्गाला लागून
त्यांचा उद्धार करितील. आणि अशीं सन्मार्गावर्ती कुलें
जर एक शेंपन्नासच आमच्या या सध्यां अगदींच हतवीर्य
आणि कर्तव्यशून्य बनलेल्या लोकांत निवडतील तर
तेवढ्यानेंही आमच्या देशाचा उद्धार होईल खास. आज
जिकडे पाहावें तिकडे दैन्यच दैन्य पसरलें आहे. या बेदाद
इमामशाहींत केवळ जो बळी तो कान पिळी अशी स्थिति
होऊन राहिली आहे. ईश्वरा! आज हीं माझ्यासमोर तुझ्या
कृपेच्या पावसानें चांगलीं जोमास लागलेलीं पिकें उभीं
आहेत; तथापि तीं माझ्या माणसांच्या निर्वेध उपयोगीं
पडतील असा थोडा तरी भरंवसा आहे काय ? एखाद्या
रानडुकराप्रमाणें मस्त झालेल्या राजपुरुषांची त्यांच्यावर
धाड पडून हीं केव्हां धुळीस मिळतील याचा कांहीं एक
नेम नाहीं. आह्मीं शेतकऱ्यांनीं मेहनत मशागत करून
पोटच्या पोरापेक्षांही अगदीं प्राणापलीकडे जपून हीं पिकें
उत्पन्न करावींत, आणि ऐन मळणीच्या प्रसंगीं खळ्यावरच
दिवसा ढवळ्या राजसत्तेच्या पाठिंब्यावर सुलतानी स्वा-
रांनीं येऊन त्यांची लूट करावी. अशा एकका दोन ह्मणून
सांगाव्या—शेंकडो तऱ्हांचा त्रास, देवा! आह्मां हिंदूंस

अलीकडे सोसावा लागत आहे. यांची एकेक कृती मनांत आणली ह्मणजे नको हें जिणें असें होऊन जातें. त्यापेक्षां असल्या या मगरूर व मदांध लोकांशीं प्रसंगीं दोन हात करून या अशाश्वत जगास कायमचा रामराम ठोकावा तें बरें असें वाटतें." मालोजीच्या मनांत वरील प्रकारचे विचार चालले होते. त्याच्या अंतरंगांत त्यांनीं अगदीं कल्होळ करून सोडला होता. तो त्या विचारांशीं इतका एकरूप होऊन गेला होता कीं त्यास थंडी वगैरेचें भानही उरलें नव्हतें.

इतक्यांत जवळपास कोठून तरी घोडेस्वारांची दौड येत असावी असा कोपीवरील राखणदारास भास झाला; व तो ज्या बाजूकडून घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकूं येतोसा वाटला त्या बाजूस कावऱ्या बावऱ्या मुद्रेनें कानोसा घेऊं लागला, व मध्येंच लांबवर न्याहाळूं लागला. तों नुसती बरीचशी धूळ मात्र वर उडालेली त्याच्या दृष्टीस पडली; व दौड एकदम—कां तें कोण जाणे—मध्येंच थांबल्यामुळें आवाज मुळींच ऐकूं येईनासा झाला. तेव्हां त्याला मोठा विचार पडला. तथापि त्यानें आपली गोफण हुडकून काढिली व प्रथम दोनतीन धोंडे घेऊन ज्या बाजूस त्याला धूळ दिसली होती त्या बाजूस ती धूळ अमुक एक अंतरावर असावी असा अंदाज बांधून ते त्या बाजूस तितक्या अंतरावर जातील अशा बेतानें त्यानें गोफणीनें फेकले. नंतर हळूच तो कोपीखालीं उतरला. तों फिरून घोड्यांच्या टापा ऐकूं येऊं लगल्या आणि त्या पहिल्यापेक्षांही स्पष्ट रीतीनें. राखणदार फिरून कोपीवर चढला व त्यानें दौड कोणत्या दिशेकडून कोणीकडे येत आहे याचें नक्की

धोरण बांधलें. आपल्या पाटिलवाड्यावरच ही दौड होत आहे अशी त्याची खात्री होऊन तो अगदीं घाबरून गेला. मालूस या प्रकाराचें कांहींच भान नाहीं. तो आपल्या प्रक्षुब्ध विचारसागरांतच गटकळ्या खात होता.

इकडे राखणदारास अगदीं खात्री पटली कीं ही दौड आपल्याच शेतामागील पाटिलवाड्याच्या बाजूस जवळ जवळ येत आहे. हा पाटिलवाडा देशावरील रीतीप्रमाणें माळवदी असून जरी घेराला पुष्कळ विस्तृत होता तरी एकमजलीच होता. यांत भोंसल्यांचा सर्व दाणागोटा, वैरण, बींबियाणें आणि इतर सर्व सांठवण ठेवण्याची वहिवाट असे. शिवाय इतर लोकही आपलें शिलकी धान्य निर्भय ह्मणून पाटलांच्या परवानगीनें येथेंच ठेवीत असत. कोणत्याही वेळेस ५० । ७५ खंडी गल्ला या पाटिलवाड्यांत शिल्लक नाहीं असें होत नसे. तेव्हां 'ही दौड रात्रीच्या वेळेस पाटिलवाड्याकडे कां बरें येत आहे? कांहीं दगा तर नसेल?' अशी शंका सहजच राखणदाराच्या मनांत आली, आणि लगेंच तो घाबऱ्या घाबऱ्या जवळपास असलेल्या झोंपड्यांतील चारचौघांस उठविण्याच्या इराद्यानें तिकडे जाऊं लागला. तोंच पाटिलवाड्याच्या बाजूनें शिंग वाजल्याचा आवाज त्याला स्पष्ट ऐकूं आला. हें शिंग मालोजीला जरा भानावर आणण्यास कारण झालें. हे छोटे पाटिलबुवा 'शिंग कां वाजलें असावें?' असा आपल्याशींच विचार करावयास लागले. राखणदारानेंही शिंग ऐकतांच ती नेहमींची निशाणी ओळखून सर्व गडीमाणसांस जागें करण्याची जास्तच लगट केली. त्यामुळें शेतांत हळूहळू चळवळ सुरू झाली आणि

ही एकदम इतकी सर्व बाजूंला माणसांची चाहूल काय ह्मणून असें मनांत येऊन तो ताडकन् उठला .आणि कावऱ्याबावऱ्या मुद्रेनें इकडेतिकडे पाहूं लागला. इतक्यांत फिरून एकदां शिंग वाजलें. या वेळेस शिंगाड्यानें फारच भयसूचक लांबचलांब आणि मोठ्या आवाजानें असें शिंग फुंकलें.

आतां मात्र आमचे छोटे पाटिलबोवा पुरे भानावर आले, आणि त्यांचें जें कांहीं अवसान होतें तें सारें त्यांनीं या प्रसंगास पाठ देण्याकरितां खर्च करण्याचा निश्चय केला व ते आपले ते पाणीदार व चंचल डोळे गरगर फिरवूं लागले. पाटिलवाड्याकडील आरोळ्या आणि चहूं बाजूंच्या लोकांची चाहूल यांनीं, गेल्या घटकेस जें आवार अगदीं सामसूम होतें तें सर्व जणूं अगदीं चालूं-बोलूं लागल्याचा भास झाला. कांहीं शिंगाच्या आवाजानें, कांहीं राखणदार नागूजीच्या खटपटीनें आणि बाकीचे या गडबडीनें मिळून आतां सर्व कुळंबी लोक जागे झाले होते, आणि प्रत्येकानें आपापला गोफण-गुंडा व दंडुका बाहेर काढला आणि टोळ्याटोळ्यांनीं पाटिलवाड्याकडे ते सारे लोक निघाले. कारण कांहीं तरी दगा खास आहे अशी त्या सर्वांची खात्री झाली. पाटिलवाड्यावर जर रामोशांचा अगर कोणाचाही हल्ला येऊन गल्ल्याची लूट झाली तर सर्वांस पोरांबाळांसह उपाशी मरावें लागेल हें त्यांस माहीत होतें. पाटिलवाड्या-कडूनही कांहीं गडी अगदीं धांपा टाकीतच इतक्या अवकाशांत इकडे येऊन धडकले. त्यांतील एक खळ्यावर मालोजीरावास पाहून एकदम चपापला, व थबकून उभा

राहिला व तो कांहीं बोलणार, तोंच त्याला ओळखून "कायरे रामजी, ही काय गडबड आहे? हे लोक सर्व मिळून चालले कोठें? शिंग कां वाजलें? सारें लवकर सांग काय असेल तें " असें मालोजीनेंच त्याला विचारिलें. रामजीला मालोजीरावास खळ्यावर पाहून फारच आचंबा वाटला होता. ह्मणून तो ह्मणाला " राव आतां मात्र शर्थ झाली आपल्यापुढ! हतं इकत्या वादूळ थंडीमदी ऐकलेच काय करीत व्हताजी ? तकडं वाड्यावर आलीया सोरांची दौड. त्येंचा नाइक ह्मनतो गल्ला उघडा करूनशेनी आमच्या सवाधीन करून द्या मुकाट्यान; न्हाई तर आह्मी ब्येसक लूट करूं. शिंग त्या पाइंच वाजलं आपल्या समद्या गड्यास्नी इशारा मिळावा ह्मणून. त्यापर्माण हे समद तकडच चालल्याती. "

**मा०**—असें काय? तर मग चल. मीही येतों तुमच्याबरोबर तिकडे. पण कायरे रामजी! वाड्यांतील तळघरांत बाबांचीं हत्यारें आहेत. तुला नाहीं माहीत, आपण तीं दसऱ्याच्या दिवशीं पुजायला काढतों तीं ? माहीत असतील तर बघ त्यांतली एक ती थोरली तरवार आणि एक लहानसा बिचवा व कट्यार अशीं जलदीनें बाहेर घेऊन येशील तर.

**रा०**—जी मला हैती माहीत तीं कुठ असत्यात तें. पुन आपुन त्येंच काय करनार? त्या सोरांची जमात लई मोटी है बघा मोटी. तत का पोरासोराच काम है व्हय? अन का एकल्यादुकल्यानं त्येंच्याशीं निभाव लागतुया ? अन् मी ह्मनतों आपल वय तरी है हत्यार घेऊनशानी लढण्याचं? राव अस नका करूं राव. अजून सोळा वरसंबी नसत्याल

झालीं आपल्यालान् मासाब तरी ह्मंगत्याल काय अमाला? पोराच्या हातांत हत्यार देऊन्न इकत्या जणांबरोबर आमी तुमाला लढूं दिल न कांहीं भलतंच्यासलतंच झाल तर?

**मा**ः—" हें बघ रामजी त्या सतरा बयादी नको सांगत बसूं मला तूं. बस्स, मीं सांगतलें तेवढें काम तुझ्यानें होत असलें तर कर, नाहीं तर चालता हो इथून तुला वाटेल तिकडे. मी स्वतां असाच जाईन त्या स्वारांच्या अंगावर. मग मारीन, किंवा मरेन; पण मी इथें जवळ असून नामर्दासारखा माझ्या गह्उयाची लूट त्या चांडाळांना कधीं नाहीं करूं देणार." मालोजीचा व रामजीचा हा संवाद ऐकून, वाड्याकडे निघालेल्या लोकांपैकींच अकस्मात् कांहींचें इकडे लक्ष गेल्यामुळें. मालोजीभोंवतीं बरेच लोक या वेळीं जमा झाले होते. त्या सर्वांस मालोजीचें हें ईर्षेचें बोलणें ऐकून फारच कौतुक वाटलें आणि ते मनांतल्यामनांत ह्मणूं लागले कीं 'देवा, आमच्या या छोट्या धनीसाहेबांस उदंड आयुष्य दे.'

**रा**ः—( त्या जमलेल्यांपैकीं एका वृद्धास ) लइ वंगाळ बकूत आला बगा हा! आतां येंच्या ह्मनन्यापरमानं करावं तरी पंचाइत; ना करीन तर तकडून बी बगा हे तर अक्षी बिथरून गेल हैती. कसं करावं जी? काइबी युगत काढा-या व्होवी मल्हारबा आपून या वक्ताला.

**मल्हा**ः—युगत काय काढावी आपून तरी? त्येंच्या म्होर तरी पुना—

**मा**ः—"रामजी! कां तुझ्यानें होत आहे कीं नाहीं मीं सांगितलेलें काम? युक्ती कसल्या काढीत बसला आहेस? त्या तुझ्या युक्ती मला मुळींच नको आहेत. मल्हारबा,

तुह्मी चला सारे माझ्यामागून. मी त्या स्वारांचा समाचार घेतों. चला. नसलीं हत्यारें तर नसलीं. हें पहा ( तेथल्याच एका झोंपडीच्या कळकास हात घालून. ) माझें हत्यार, ( तो कळक उपसतो. ) येवढें बस्स आहे मला. तुमचे विळेकोयत्या आहेत कीं नाहींत तुमच्याजवळ.? मलाही एक द्या त्यांतला सुरेख चांगल्या धारेचा आणि हलकासा विळा; आणि एकादें खुरपें असलें तर आणा. त्याचें पुढचें पातें काढून या कळकाला लावलें कीं झालें काम. खासा भाला तयार होईल. हं चला आटपा लवकर. ( कानोसा घेऊन. ) ह्या पहा वाड्याकडून आरोळ्यांवर आरोळ्या येताहेत जास्त जास्त जोरानें. चला तर घ्या तुळजा-आईचें नांव. जय भवानीकी जय! हरहर महादेव!" ( ते लोकही हरहर महादेव, आई जगदंबे भवानीकी जय, असा पुकारा करितात. ) मालोजीनें तर आपला मोर्चा लगेच वाड्याच्या बाजूस फिरविला. इकडे त्या कुळंब्यांनीं भीतभीतच त्याला एक सुंदर आणि हलकेंसें चांगलें पाणीदार खुरपें आणि एक तसाच विळा हीं आणून दिलीं, आणि रामजी व मल्हारबा हे कानाशीं लागले व त्या दोघांनीं पुढची सर्व हिकमत ठरवून ठेवली. हें सर्व कृत्य आपणांस हा मजकूर वाचावयास लागणाऱ्या वेळापेक्षांही कमी वेळांतच झालें.

तिकडे वाड्यावर जी स्वारांची टोळी चालून आली होती ती येथें आपणांस कांहीं विशेष अडथळा होईल अशा अंदाजानें आलेली नव्हती. तथापि 'सशाच्या शिकारीस वाघाची तयारी' या न्यायानें त्यांची तयारी चांगलीच होती. त्यांच्या नायकाचा असा अंदाज होता कीं नुसत्या धाकदपटशावर आपलें सर्व काम भागेल. हे शेतकरी खेडवळ

लोक आपल्याशीं थोडीच टक्कर देणार आहेत. त्यांच्या जवळ ना हत्यार ना पात्यार; आणि असें खरेंच. परंतु भोंसल्यांच्या पाटिलवाड्याची गोष्ट जरा निराळी होती. त्या पाटिलवाड्याच्या संरक्षणार्थ शंभुमहादेवाच्या खोऱ्यांतील अस्सल लढवय्ये १०–१२ असामी रामोशी असत. शिवाय बाबजी रावानें आपल्या कुळांस खाण्यापिण्यास यथेच्छ मिळून त्यांचीं पोरेंबाळें चांगलीं टकींटोणपीं व सशक्त असावीं ह्मणून इतरांपेक्षांही तो त्यांस जमीनकसाई जास्त देत असे. शिवाय स्वतः पाटीलबोवांस शिकार वगैरेचा फार नाद असल्यामुळें त्यांच्याबरोबर त्यांचे गडी वगैरेही चांगले चपळ,धाडशी, प्रसंगीं अंगावर घेऊन वाघ वगैरे श्वापदांची शिकार करण्यांत पटाईत असे लागत, आणि तशींच निवडक माणसें तो आपल्या कुळंबाव्यांत ठेवीत असे. या प्रकारच्या अस्सल रजपुती शिक्षेनें भोंसल्यांच्या पाटिलवाड्याची लूट अगदींच ह्मणामारी आणि रक्तपातावांचून होण्यासारखी नव्हती.

मालोजीची या सर्व गडबडींत अनेक तऱ्हेच्या उच्छृंखळ विचारांशीं झगडण्यांत अशी धांदल उडून गेली होती कीं क्षणैक आपण काय करतों आणि कोठें आहों याचेंही त्याला भान नाहींसें झालें होतें. तथापि लवकरच सर्व अवान्तर विचारतरंगास दबवून सध्यांच्या प्रसंगीं आपणांस काय केलें पाहिजे आणि तें कसें पार पाडावयाचें हें आपल्याशीं ठरवून तो झपाट्यानें त्या सर्व मंडळीसह वाड्याकडे चालूं लागला. हा वाडा खळ्यापासून हांकेच्या अंतरावर होता. तेथपासून चौफेर मालोजीच्या पाटिलकीच्या हक्काचीं शेतें सारखीं लागलेलीं होतीं. या

प्रसंगीं वाड्याकडे चारी बाजूचीं गडीमाणसें चोहोंकडून धांवून आलीं होतीं. तेथें यांचें असें सर्व मिळून चांगलें १००।१२५ माणूस जमा झालें होतें. सर्वांजवळ गोफण, विळा, कोयता, एक काठी इतकी सामुग्री होती. रामोशी लोक वाड्याच्या सोप्यांची शक्य ती नाकेबंदी करून आपण मुख्य दरवाज्यावर हत्यारबंद पहारा करीत उभे राहिले. स्वारांची जमात सरासरी ५०।६० माणसांची होती. तथापि त्यांनीं आपली आगळीक केल्यावांचून आपण त्यांच्या वाटेस जावयाचें नाहीं, असें त्या रामोशांनीं आपसांत ठरवून ठेविलें होतें. स्वारांच्या नाइकानें प्रथम रामोशांच्या नाइकांशीं बोलण्यास प्रारंभ केला, आणि गल्ला आमच्या स्वाधीन झाला नाहीं तर आह्मी वाड्यावर दौड करूं आणि तेथील सर्व इसमांचे मुडदे पाडून जबरदस्तीनें गल्ला लुटून नेऊं अशी तो त्यास भीती घालीत होता. परंतु रामोशांच्या नायकानें हें त्याचें ह्मणणें मान्य न करितां त्याला धुडकावण्याचा घाट घातला. होय ना करितां करितां काम निकरावर आलें, आणि चकाचकीची वेळ अगदीं जवळ येऊन ठेपली. इकडे शिंगाच्या इशाऱ्यानें जे कुळंबी चहूंकडून येण्याचा संभव होता, त्यांनीं एकदम वाड्याशीं न येतां जरा लांबच दबा धरून बसावें असा रामोशांच्या नाइकानें त्या सर्वांस वेळेवर इशारा पोंचविला होता.त्याप्रमाणें ते झाडांआड, शेतांमधील बांधाआड, असे सर्व लपून बसले होते. परंतु मालोजीच्या छोट्या तुकडीस मालोजीच्या हट्टामुळें आणि उतावळीमुळें तो बेत साधतां येईना. मालोजी त्यांचें कांहींएक न ऐकतां तडक पुढें पुढेंच जाऊं लागला. तेव्हां निरुपाय होऊन त्याच्याबरोबरच्या

लोकांस त्याच्याहीपुढें धांवावें लागलें. रामोशी व स्वारांचा नाईक यांची हातघाई सुरू होऊन भांडणास तोंड लागलें. स्वारांच्या नाइकानें आपल्या स्वारांस इशारा करितांच ते सर्व लांडग्याप्रमाणें चहूंबाजूंनीं एकदम चालून आले. कुळंब्यांचा गोफणगुंडा सुरू झाला, रामोशांचा पट्टा गरगर फिरूं लागला, आणि लवकरच जिकडे तिकडे, हाणा मारा ठोका, पकडो काटो मत छोडो, असा एकच गिल्ला सुरू होऊन जशी कांहीं क्षणभर पाटिलवाड्यासमोर लहानशी सोनपतपानपतच माजली. रामजी हत्यारें आणण्याकरितां मागील दारानें चोरून तळघरांत शिरला आणि हत्यारें घेऊन बाहेर येणार तों मागील दारावरही दोन स्वार येऊन पोंचले होते, आणि त्यांनीं तर दार फोडण्याचा संकेत केला होता. इतक्यांत आयतेंच रामजीनें दार उघडलें. त्यासरसे ते लोक त्याच्या अंगावर तुटून पडले, आणि रामजी 'मेलों मेलों' ह्मणून आरोळ्या ठोकूं लागला. त्याच्या त्या आरोळ्या ऐकतांच कसलें काय नि कसलें काय? सिंहाच्या छाव्याप्रमाणें मालोजी तडक त्या स्वारांच्या अंगावर धांवून गेला. त्यासरशीं हां हां ह्मणत निराश होऊन त्याच्याबरोबरचे गडीही एकदम सर्व त्या स्वारांवर धांवले, आणि त्यांनीं त्या असावध स्वारांस क्षणार्धांत जमीनीवर आणिलें. त्यांचे घोडे एकीकडे आणि ते एकीकडे अशी त्यांची स्थिति झाली. ते सावध होऊन यांच्या अंगावर चालून येणार तोंच मालोजीनें रामजीच्या हातांतील ती तरवार आणि बिचवा वगैरे घेऊन एकदम त्यांपैकीं एका घोडयावर स्वारी केली, आणि त्या स्वारांच्या अंगावर अशा शिताफीनें घोडा घातला कीं त्यांस इकडे

तिकडे करण्यास मुळींच सवड ठेविली नाहीं. मग काय विचारतां? हातांतील तरवार चालवून या मर्दबच्चानें तेथल्या तेथें त्या दोघांही स्वारांस यमसदनीं पाठवून दिलें. आणि रामजीसही आपल्याबरोबर दुसऱ्या घोडयावर स्वार होण्यास सांगून आपल्या मागून येण्यास इशारत केली. प्रसंगानें आणि उदाहरणानें कित्येक वेळां एखाद्या नेभळ्या मनुष्याच्या हातूनही अत्यंत पराक्रमाचीं कृत्यें घडतात. मग रामजी तर जातिवंत मराठा होता, आणि बाबजी पाटलाच्या तालमींत तयार झालेला होता. त्यास आपल्या छोटया धन्यानें आपले प्राण वांचविण्याकरितां स्वतःच्या प्राणावरही उदार होऊन केलेली मर्दुमकी पाहून इतका वीरावेश आला कीं तो या प्रसंगीं स्वतःचे प्राण ह्मणजे कःपदार्थ समजत होता इतकेंच नव्हे, तर आज जर धन्याच्या प्राणरक्षणाकरितां हे प्राण बळी पडले तरच त्यांचें सार्थक होय, नाहीं तर व्यर्थ आपलें जिणें असें त्यास झालें होतें. इकडे मुख्य दरवाज्यावर, रामोशांचा पुढून मार आणि मागून गोफणगुंडयांचा मार या दुहेरी मारांत सांपडून, लुटीस आलेल्या स्वारांची बरीच तारांबळ उडून गेली होती, आणि त्यांच्या नाइकास आतां पुढें काय करावें ह्याचा मोठा विचार पडला होता. इतक्यांत ही दुक्कल त्या हातघाईत येऊन मिसळली. मग काय एकच गोंधळ झाला. या सिंहाच्या छाव्यानें आपली तरवार सारखी चालू ठेवण्याचा सपाटा चालविला होता. त्याप्रमाणेंच त्याचा साथीदारही धन्याच्या कृतीचें अनुकरण करण्यांत काडीइतकीही कसूर करीत नव्हता. ह्या आकस्मिक मारानें तर स्वारांच्या टोळीची अगदीं दे माय धरणी ठाय अशी

स्थिति होऊन गेली. त्यांच्यापैकीं एकएक असामी कमी होऊन त्याच्या जागीं विरुद्ध पक्षांत तितकी जास्त जास्तच भर पडत चालली. त्यांच्याच घोड्यांवर बसून त्यांचींच हत्यारें घेऊन त्यांना मारावयाला एकामागून एक हे शेतकरी शिलेदार तयार होऊं लागले. आणि आतां जर मुकाट्यानें या लोकांस शरण गेलों नाहीं तर आपणां-पैकीं एकही असामी यांच्या हातून जिता सुटून जाण्याची आशा नको, अशी स्वारांच्या टोळींतील मुख्याची पक्की खात्री झाली. ह्मणून त्यांनीं हळूहळू आपलें हत्यार आवरून कोणी रामोशांच्या नाइकाची, कोणीं इकडे मालोजीकडल्या लोकांची अशी विनवणी सुरू केली. मालोजी या वेळेस इतका रागावला होता आणि त्याला असा जबरदस्त खून चढला होता कीं त्याच्यापुढें बोलण्याची एकाचीही इकडल्याची किंवा तिकडल्याची छाती होईना. त्याला असें झालें होतें कीं या सर्वांस आज कंठस्नान घालावें. एकालाही जिता सोडूं नये. त्यांतच कांहीं स्वार पळून जाण्याचा क्वचित यत्न करतांनां त्याच्या दृष्टीस पडले कीं घातलाच त्यानें आपला घोडा त्यांच्या अंगावर बेधडक. त्यानें घोडा घातला कीं न जाणों भलतेंच कांहीं होईल ह्मणून त्याच्याहीपुढें रामजी वगैरेंस आपला घोडा घालावा लागत असे. मालो-जीच्या या शौर्याची आणि करामतीची रामोशांस अजून मुळींच बातमी नव्हती; परंतु जेव्हां त्यांस ही सर्व हकीकत कळली तेव्हां त्यांच्या मनास जी धन्यता वाटली आणि जो आपल्या या छोट्या धनीसाहेबांबद्दल अभिमान उत्पन्न झाला तो कांहीं अवर्णनीयच. ते सर्व आपल्यापाशीं जीव-दान मागावयास आलेल्या त्या स्वारांच्या नाइकाला घेऊन

मालोजीकडे आले, आणि त्याला त्यांनीं लवून मुजरा केला व त्या स्वारांच्या नायकाकडूनही त्यास तसाच मुजरा करविल्यावर त्याच्या विनंतीस मान देण्याबद्दल त्यांनीं रदबदली केली. त्या स्वारांच्या नाइकास त्यांनीं असें सांगितलें कीं, हे आमचे धनी यांच्याजवळ तुह्मांला काय बोलावयाचें असेल तें बोला. त्यांच्या मर्जीस येईल त्याप्रमाणें ते तुमचें बोलणें ऐकून घेतील, आणि आह्मांस हुकूम करतील त्याप्रमाणें आह्मी त्यांचे बंदे गुलाम तुह्मांस धरून ठेवूं, नाहीं तर सोडून देऊं. आमचें काय? ज्याचें अन्न खाल्लें त्याची चाकरी बजावावयाची. असो शेवटीं सर्वांच्या विचारानें त्या स्वारांच्या नाइकापासून मी फिरून कधींही निरुपद्रवी शेतकऱ्यांस लुटणार नाहीं अशी शपथ घेववून त्यास व त्याच्या लोकांस यथेच्छ शाळूचा हुरडा वगैरे खाऊं घालून मालोजीनें आपले जन्माचें ऋणी करून जाऊं दिलें. मालोजीनें हा लढाईच्या कामाचा श्रीगणेशायनमःचा धडा किती सुरेख रीतीनें पाठ केला आणि त्याची परीक्षा कशी सुंदर दिली हें जेव्हां त्याच्या आईस कळलें तेव्हां त्या माउलीस किती धन्यता वाटली असेल याचा वाचकांनींच अंदाज करावा. याशिवाय ह्या प्रसंगींच्या त्याच्या पराक्रमाच्या कीर्तीनें त्याला एकंदर काय काय लाभ झाले हें पुढील भागांत कळेल.

---

## प्रकरण ४ थें.

मागील प्रकरणांत आपला नायक सरासरी सोळा वर्षांच्या उमरीचा होता ह्मणजे तो आतां हळूहळू बाप्या

होण्याच्या योग्यतेस येत होता. महाराष्ट्रांतील ब्राह्मणेतर यच्चावत् जातींतील लोकांस त्यांतही विशेषतः सुखवस्तु मराठ्यांत आणि कुळंब्यांत तरुण मुलांनीं १५–२० वर्षांच्या उमरींत थोडीफार तालीम करण्याचा बहुतेक प्रघात असेः निदान एका पिढीच्या मागच्या काळापर्यंत तरी तसा प्रघात देशावर सर्वत्र असे, असें बरेंच खात्री-पूर्वक सांगतां येतें. मालोजीलाही नुकताच कोठें या तालमीचा नाद लागत चालला होता. तथापि फडावर कुस्ती मारण्यापर्यंत अजून त्याची मजल आली नव्हती. या मल्लविद्येंत त्याच्या बरोबरीच्या तरुणांत कोणीच त्याची कुचाळी काढण्यास धजत नसे इतका त्याचा आपल्या गावांत दरारा असे. मालोजीची आई त्यास या तालमीच्या नादाकडे, हलक्या संगतीनें कदाचित् तो बिघडेल या भीतीनें, फारशी लागूं देत नसे. तो तींत चांगला राजरोस प्रसिद्धीस न येण्याचें हेंही एक कारण होतें. परंतु गेल्या कार्तिकांतील पाटिलवाड्यावरील हल्ल्याची हकीकत जेव्हां लोकांत पसरली तेव्हांपासून हें सर्व गाडें अगदींच फिरलें होतें. हे तरणे पाटिलबुवा हजर असल्यावांचून मुळीं आखाड्यांत कुस्त्याच होण्याची मारामार. गांवांतील कोण-त्याही सार्वजनिक कामांत हे तरुण पाटिलबुवा असलेच पाहिजेत असें लोकांस वाटूं लागलें. ठीकच आहे. एक तर गांवचा, वयानें लहान कां होईना, पण खरा खरा अधि-कारी आणि दुसरा गुणी. इकडे घरांतही थोडा थोडा रंग फिरत चालला. विठूजीला थोडें थोडें कांहीं भीतीनें आणि कांहीं समजुतीनेंही, मालोजीच्या मनाप्रमाणें वागावेंसें वाटूं लागलें होतें, आणि आपला मुलगा जरी लहान आहे, तरी

तो प्रसंगाला पाठ देणारा आणि बराच समजूतदार आहे, अशी तिची जास्त जास्त खात्री होत चालल्यानें हळूहळू स्वसंतोषानेंच त्याची आईही आपला अधिकार त्याच्या स्वाधीन करूं लागली. अशा रीतीनें ज्या ज्या प्रमाणानें मालोजीचा आणि लोकांचा हरतऱ्हेचा संबंध वाढत चालला आणि त्यांत तो निभावत चालला, त्या त्या प्रमाणानें लोकांची त्याजवरील श्रद्धा, त्याचा लोकांवरील दाब आणि वजन हींही सारखीं वाढत चाललीं, आणि इकडे विठूजीलाही भावाच्या तंत्रानें चालण्याची जास्तजास्तच गरज भासूं लागली; आणि तसें वागण्यांत फायदाच आहे, असें जसजसें त्याच्या प्रत्ययास येत गेलें तसतसा दोघां भावांमधील आपपरभावास अज्जी फांटा मिळत गेला. मालोजीला आपलपोटेपणा कधीं विटाळही करण्यास धजत नसल्यानें आपल्याबरोबर सर्वत्र आपला भाऊही आपल्या यशाचा आणि मानमरातबाचा वांटा घेण्यास असलाच पाहिजे अशी त्याची तजवीज असे. याप्रमाणें वर्ष दोन वर्षांतच ही तरुण पाटलांची जोडी एकमेकांच्या बंधुप्रेमाबद्दलही रामलक्ष्मणांप्रमाणें नांवाजत चालली. त्यांनीं हळूहळू दांडपट्टा, भाला, बोथाटी, तरवारीचे हात यांचाही अभ्यास चालविला आणि त्यांत ते दोघेही लवकरच चांगले पटाईत झाले. तरी मालोजीची सफाई आणि चलाखी विठूजींत क्वचितच दृष्टीस पडे. कुस्तीचाही अभ्यास मालोजीरावानें चांगल्याच तऱ्हेवर चालविला होता, आणि त्यांत त्यानें चांगलेंच कसब संपादन केलें. शरीरानें दुहेरी हाडाचा आणि चपळ असल्यानें युक्ति आणि शक्ति या दोहोंचाही त्याच्या ठिकाणीं एकत्र वास झाला होता. भर फडांतही

एका मागून एक चार पांच प्रसंगीं चांगल्या चांगल्या नांवाजलेल्या मल्ल गड्यांची मालोजीरावानें. त्यांच्या मर्जीप्रमाणें खड्या खेळानें, जमीनधांशीनें, पेंचास तोड आणि तोडीस उलट नवा पेंच अशी हरतऱ्हेनें कुस्ती करून मनसोक्त संभावना केली. या सर्व गोष्टींचा असा परिणाम झाला कीं, भोंवतालीं पांचपन्नास कोसांत मालोजीरावाशीं हरएक खेळांत सामना करणें ह्मणजे एक अद्वितीय मान समजला जाऊं लागला. शिवाय अशा सामन्यांत मालोजीरावाचीच सरशी व्हावयाची अशी साधारण लोकांची त्या प्रान्तभर अगदीं खात्री असावयाची. त्यांनीं त्याबद्दल एवढीतेवढी पैज मारण्यासही मागेंपुढें पाहूं नये, आणि मालोजीच्या पक्षास पैज हरण्याची पाळी क्वचितच, किंबहुना मुळींच येत नसे. याप्रमाणें मालोजीची हा उत्तम कुस्तीगीर अशी ख्याति जातां जातां निंबाळकरांच्या संस्थानी तालीमखान्यापर्यंत जाऊन पोंचली, आणि असल्या लढवय्या गड्याला आपल्यापैकीं जर एखादा जोड देण्यास सांपडून आपणांस यश मिळवितां आलें तर मोठी बहार होईल असें तेथील नाईक मंडळीस सहजच वाटलें. निंबाळकर हे एक स्वतंत्र सत्ताधारी संस्थानिक होते; तथापि ते कधींही विशेष अमीरी थाटानें न राहतां साधारण सुखवस्तु जमीनदाराप्रमाणेंच त्यांची वागणूक होती. इतर पुष्कळ मराठे क्षत्रिय सरदार या वेळीं दक्षिणेंतील पादशाहीपंचकांत होते. तथापि त्या सर्वांत निंबाळकरांइतके जुने आणि स्वतंत्र दुसरे कोणीच नव्हते. ते बंदे नोकर असे मुळींच नसत. त्यांची लहर लागली तर मात्र या सुलतानपंचकाच्या आपापसांतल्या भांडणांत अथवा

एखाद्याच्या स्वतंत्र विजयी स्वारींत ते कांहीं करारानें शिरत आणि आपला फायदा करून घेत असत. हे सुलतान त्यांस त्यांचा ठरलेला दाम पटवूनही कचित् प्रसंगीं एखादा बहुमानवाचक किताब वगैरे अर्पण करीत. परंतु ते स्वतः त्या किताबाची मातब्बरी मुळींच समजत नसत, किंवा त्यास भुलून त्यांच्या हुकमतींत वागण्यासही कधीं तयार होत नसत. शिवाय ते लोकांशीं मिळूनमिसळून वागत आणि सर्वस्वी त्यांच्याच कल्याणाकरितां झटत असत. वेळेस पांचपासून दहा हजार लोक ते आपल्या निशाणाखालीं जमा करूं शकत. असो. मालोजीशीं कुस्ती खाशांपैकींच कोणीं तरी मारावी असा बूट निघून त्याची तजवीज कशी करावयाची याचा विचार सुरू झाला.

निंबाळकर नाइकांस दिपा नांवाची एक मुलगी होती. ती तरुण, रूपवती व अगदीं उपवर झालेली होती. दिपाबाई ही वयानें तेरा वर्षांवर होती. चांगली शेंपन्नासांत देखणी असून आईबापांची लाडकी होती. तिला लेखन, वाचन, घोड्यावर बसणें, पोहणें इत्यादि गोष्टींचें शिक्षण मिळालें होतें. तिचें लग्न मागेंच केलें पाहिजे होतें. परंतु योग्य ठिकाण न आढळल्यानें आईबापांचा कांहीं इलाज चालला नाहीं. तथापि आतां यापुढेंही तिला अविवाहित ठेवणें ह्मणजे धोक्याचें होतें. यामुळें तिच्या बापास अतिशय काळजी लागून राहिली होती. समंजस, सुंदर आणि अतिशय लाडक्या अशा आपल्या मुलीला नवराही तसाच हुशार, उत्तम कुळांतील, देखणा, असा मिळावा असें तिच्या बापास न वाटेल तरच त्यांत नवल. त्यांत दिपाबाईची गोष्ट तर याहीपेक्षां विशेष विचार करण्यासारखी होती

कारण ती घोड्यावर बसण्यांत फारच पटाईत होती; त्याच प्रमाणें मर्दानी खेळांची तिला बरीच आवड असे; पट्टा, बोथाटी यांतदेखील ती चांगली तरबेज होती. आणि तिचें वय आतां स्वतः आवडनिवड करण्या योग्य झालें असल्यानें बापानें केवळ आपल्याच पसंतीचा तरुण पाहून त्याच्या गळ्यांत तिला बांधणें कितपत सुखाचें होईल याचाही बराच विचार होता. अर्थात्, पाहतांच डोळ्यांत भरणारा, नजरेनेंच दरारा आणि धाक उत्पन्न करणारा, शूर आणि चांगलाच समंजस व बराच प्रौढ असा कोणी तरी तरुण तिला नवरा पाहिला पाहिजे, तरच तो तिच्या पसंतीस येईल आणि तिला सुख लागेल; अशा प्रकारची दिपेच्या आईबापांची अगदीं खात्री झाली होती. असा एखादा तरुण गृहस्थ कोठें सांपडेल तर पाहावा ह्मणून ते रात्रंदिवस त्या विचारांत होते. तथापि आपल्या उच्च कुलाची त्यांत कोणत्याही प्रकारें मानखंडना होतां कामा नये, ह्मणजे तो उच्च कुलांतील असला पाहिजे आणि त्याच्याजवळ द्रव्य वगैरेही पुष्कळ असलें पाहिजे, तरच तेथें मुलगी द्यावयाची अशी तिच्या आईची मनीषा होती. दिपेलाही आतां चांगलें समजूं लागलें होतें आणि संसारसुखाचा अनुभव आपणांस केव्हां मिळेल, तो जितका लवकर मिळेल तितका चांगला, आतां त्यावांचून जाणारे दिवस ह्मणजे अतिशय दुःखाचे आणि धोक्याचे, असें तिला वाटूं लागलें होतें. तिचें मुग्ध तथापि लवकर उमलण्यास झालेलें यौवनपुष्प तिला तें स्वाधीन करण्यास योग्य असा पुरुष डोळ्यांसमोर नसल्यानें फार त्रासदायक झालेलें होतें. 'हें असेंच कोमेजून तर जायचें नाहींना? किंवा भल-

त्याच्याच हातास लागून ह्याचे हाल तर व्हावयाचे नाहींत ना ? वस्तूचा उपभोग घेणारा त्या वस्तूची किंमत जाण-ण्यास योग्य आणि त्या वस्तूचें योग्य रीतीनें संरक्षण कर-णारा असा जर असेल तर त्या वस्तूच्या अस्तित्वाचें खरें चीज होतें. नाहीं तर त्याची मातीच व्हावयाची, कोंबड्या ला रत्न सांपडून काय उपयोग ? त्यालाही त्यापासून सुख नाहीं आणि त्याच्या हातून त्या रत्नाचीही किंमत होणार नाहीं, ' असे अनेक प्रकारचे विचार तिच्या मनांत येऊन चिंता ही तिची अगदीं हृदयस्थ सखी झाली होती. तिला सोडून आपल्या इतर मैत्रिणींशीं मन मोकळें करून बोल-ण्यास ती त्यांच्या वांट्यासही येईनाशी झाली. जेव्हां प-हावें तेव्हां आपली चिंतातुर आणि थकल्यासारखी दीर्घ श्वास टाकीत असलेली ती त्यांच्या दृष्टीस पडूं लागली तिच्या आवडत्या कला आणि खेळ हे सुद्धां एकएक आ-पलें आतां येथें लालनपालन नीट रीतीनें होत नाहीं असें पाहून तिच्यापासून दूर पळाले. अशी दिपेची स्थिति फार नाजूक झाली होती. ती चाकरमाणसांवरही विनाकारण एखादे वेळेस तोंड टाकूं लागली. जी दिपा कधीं निष्कारण कोणाला अवाक्षरही बोलावयाची नाहीं तीच अलीकडे असें कां करते ह्मणून त्या चाकरमाणसांसही मोठें गूढच पडत असे. ह्मणून ते तिच्याशीं जपून वागूं लागले.

आजपर्यंत या हिंदुस्थानांत मुसलमानी अमलानें अशा कितीक तरुण अबलांस विनाकारण दुःखसमुद्रांत लोटलें असेल याचा कांहीं पत्ता आहे काय ? दिपेचें लग्न वेळेवर न होण्याला कारण केवळ चहूंकडे माजलेली इमामशाही. आणि ब्राह्म-विवाह पद्धतीनें तें वेळेवर झालें नाहीं तरी चिंता नाहीं !

परंतु क्षत्रियाला विशेष आदरणीय गांधर्वपद्धतीनें विवाह होण्याचींही अनुकूल साधनें या इमामशाहीनें नाहींशीं करून टाकिलीं होतीं, तीं जर उमाप आणि निर्भय अशीं उपलब्ध असतीं तर कांहीं कोणत्याही रीतीनें दुःखाचें कारणच नव्हतें. या इमामदांडगाईनें आणि महंमदी सबरस नीतीनें आमच्या मराठ्यांत आणि क्षत्रियांत, व इतरही पुष्कळ ठिकाणीं, नवीनच एक गोषा उत्पन्न केला होता. कारण सबरस नीतीचें उग्र आणि कडक तेज आमच्या कोमल अबलांस सहन होईना, आणि त्यांचें त्यापासून रक्षण करण्याकरितां त्यांच्याभोंवतीं पडदपोशी ठेवावी लागूं लागली. त्याचप्रमाणें ब्राह्मणेतर क्षत्रियादि जातीं-तही गांधर्व आणि स्वयंवर या विवाहपद्धतींस नियम म्हटला म्हणजे अज्जी फांटा मिळून एकच ब्राह्मपद्धती जा अमलात आली त्याचेंही कारण ही राक्षसी इमाम-शाहीच. इनें आमच्या कित्येक सुंदर आणि खरोखर हितावह अशा चालीरीती आणि उपयोगी संस्था पार नष्टनाम, भ्रष्टरूप आणि निरुपयोगी व अत्यंत अपाय-कारक अशा बनवून सोडल्या आहेत. आमच्या दिपेलाही आज जें दुःख आणि चिन्ता रात्रंदिवस त्रास देत होती त्याचेंही मुख्य आणि खरेंखरें कारण ही इमामशाहीच. नाहीं तर तिनें केव्हांच आपली निवड करून आईबापांस आणि स्वतःसही काळजींतून मुक्त करून घेतलें असतें. पण स्वतंत्र निवड करण्याची चालच बहुतेक बंद पडली होती, इतकेंच नव्हे, तर तसें करणें म्हणजे गैरशिस्त अशीही समजूत बहुतेक दृढ झाली होती. राजकीय नातींगोतीं अशीं असंबद्ध आणि घोंटाळ्याचीं झालीं

होतीं कीं "आपण एखाद्याची निवड करून त्याचें नांव सुचविलें आणि तें जर राजकीय संबंधांत आईबापांस अथवा आपल्या एकंदर कुळास विघातक असेल तर फुक-टच नाहीं का ती निवड? आणि या निवडी हजार वेळां का करावयाच्या आहेत! हें एकच मन आणि एकच शरीर अनेकांना कां वहावयाचें आहे! अथवा मन एकाला आणि शरीर दुसऱ्याला असें तरी करणें योग्य होईल? आईबापांच्या सुखाचा विचार बाजूला ठेवला तरी आपल्यापुरती सुद्धां आपण निवड करावयाची ह्मणजे या जन्माच्या गांठी, सारा जन्म ज्याचे जवळ घालवावयाचा, ज्याच्या चांगले-वाईटपणावर आपल्याला सुखदु:ख मिळावयाचें, अशाची निवड करावयाला स्वतंत्रता आणि निर्भयता हीं नकोत का? तीं कोठें आहेत मला? कोठें निर्वेध जाण्याची तरी सोय आहे का? आमच्यासारख्या अबलांनीं एक पाऊल गांवाबाहेर टाकावयाचें तर बरोबर बंदोबस्त भरपूर असून-सुद्धां आह्मी सुखरूप आणि अब्रूनें परत येऊं असा कांहीं तरी भरंवसा आहे काय?" असे नानाप्रकारचे निराशेचे विचार तिला सारखे डंवचीत होते. अशा स्थितींत आपलें कुलशील आणि इतर हरएक सद्गुण आमच्या ज्या भारतीय माउल्यांनीं उज्ज्वल असे कायम राखले त्यांना किती त्रास पडला असेल आणि कोण यातना, मानसिक आणि शारीरिक, भोगाव्या लागल्या असतील याची नुसती कल्पनाही मनांत आली तरी सुद्धां ती सहन होत नाहीं. तेव्हां प्रत्यक्ष ज्यांनीं ते प्रसंग निभावले त्यांची जितकी धन्यता गावी तितकी थोडकीच आहे.

दिपाबाईचा भाऊ हा तिच्यापेक्षां वयानें बराच वडील होता. त्याला आज विशी उलटली होती. त्याचें लग्न वगैरे झालेलें होतें, आणि तोच सध्यां घरांत कर्ता होता ह्मटलें तरी चालेल. कारण दिपेचा बाप उतार वयाचा झाला होता, आणि हळूहळू तो एकेक कारभार आपल्या या वडील मुलावर टाकून आपण उरलेले दिवस समाधानानें विश्रांतींत आणि धर्मकर्मात घालवावे असा त्याचा विचार झाला होता. या मुलाचें नांव जगपाळराव. हाही शरिरानें फार मजबूत असे; आणि त्याला कुस्तीचा तर विशेषच शोक होता. मालोजीशीं कुस्ती खेळावयाची अशी त्याची फार उमेद होती. आपण त्याला तेव्हांच चीत करूं असेंसुद्धां त्यास वाटत असे. प्रत्यक्ष मालोजीचा खेळ पाहण्याची त्याला अजून संधिच मिळाली नव्हती. नाहीं तर तो कदाचित् असें ह्मणताना. याची आपल्या बहिणीवर अत्यंत ममता होती; तथापि तो अजून वयाच्या मानानें जरा जास्त अल्लड होता. त्याचें लक्ष अजून संसारांत स्थिर झालेलें नव्हतें. यामुळें, आणि स्वभावतः स्त्रीजनाबद्दल जरा बेपर्वा असा असल्यानें त्यानें दिपेच्या अन्तरंगांत शिरून तिचा हृद्रोग नाहींसा करण्याची आपणावर किती जबाबदारी आहे, आणि त्या हृद्रोगानें तिचे किती हाल होत आहेत हें जाणण्याची कधीं खटपटच केली नव्हती. दिपेची तर आतां सर्व भिस्त कायती भाऊवर होती. ती मनांत ह्मणे कीं, 'भाऊ जर मनांत आणील तर माझें दुःख तेव्हांच दूर करील.' पण भाऊ मनांत आणील तर? तें त्याच्या मनांत भरवावयाचें कोणीं आणि कसें हाच काय तो प्रश्न होता. आणि हा बिकट प्रश्न कसा सोडवावा,

या विचारांत तिनें एक दिवस बराच वेळ घालविला. पण तिचा निश्चय असा कांहींच ठरेना. शेवटीं वहिनीकडून हें काम आपण करवावें असें तिनें आपल्या मनाशीं ठरवून टाकिलें आणि ती एक क्षणभर कांहीं समाधानही पावली.

इकडे वेरुळास पाटलीणबाईचाही अहोरात्र आपल्या मुलाच्या लग्नाबद्दलचा विचार चालू झाला होता. घरांत कोणी पोक्त आणि काळजीचा पुरुष नसला ह्मणजे मुलांच्या आयांस आपल्या मुलांचे एकदां दोहोंचे चार हात अब्रूनें आणि सुखासमाधानानें कसे आणि केव्हां होतील अशी मोठी काळजी असते त्यांत बायकांना या गोष्टीची उतावीळ विशेष असते. आपल्या मुली मुलगे घोडनवऱ्या घोडनवरे न होतां बेतशीर वयांतच त्यांचीं लग्नें होऊन जावीं ह्मणजे तें चांगलें, असा सर्व स्त्रियांचा, अर्थात् आपल्याकडील, समज आहे. शिवाय मोठी सून अथवा फार मोठा जांवई सासूबाईस मनापासून कधींच आवडत नाहीं. घोडजांवयाचें कौतुक करण्यास मुलीची आई लज्जेनें भिते, आणि मोठी सून आपल्या मर्जीप्रमाणें कितपत वागेल याची मुलाच्या आईस भीति पडते.

मुलगी सांगून जाणें हें क्षत्रियांत फारच लाजिरवाणें समजत. त्याचप्रमाणें दक्षिणेंतील मराठे क्षत्रियांचीही पुष्कळ वेळां अशी समजूत असल्याचें दिसतें. विशेषेंकरून सोळाव्या शतका पासून सतराव्या शतकाच्या अर्धापर्यंत, मुसलमानांच्या प्राबल्याच्या दिवसांत, मुसलमानांचे अंकित आणि स्वतंत्र, त्याचप्रमाणें कुलीन, परंतु दरिद्री आणि श्रीमंत अशा प्रकारचे भेद अगदीं शिखरास जाऊन पोंचल्यामुळें अनेक प्रसंगीं मुलींच्या लग्नसंबधांत

त्यांच्या आईबापांस मोठा पेंच पडत असे. यामुळें कित्येक शरीरसंबंध केवळ ध्यानींमनीं नसतांना आणि अगदीं अद्भुत प्रकारानें व आकस्मिक कारणानें जुळविले जात. आमच्या ह्मणण्याची सत्यता पटण्यास पुरेशीं साधनें सध्यां सर्व साधारण लोकांस उपलब्ध असलेल्या इतिहासाच्या पुस्तकांत किंवा बखरींत क्वचित्च सांपडतील. तथापि तीं आह्मीं मोठ्या प्रयत्नानें मिळवून त्यांचा पुरा शोध करून खात्री करून घेतली आहे. शिवाय आमच्या नायकानें आपल्या आयुष्याची इतिकर्तव्यता ह्मणून जी कृती मोठ्या धैर्यानें आणि साहसानें केली, तीच या गोष्टीचा चांगला पुरावा आहे. आणि तिची माहिती थोडीफार सर्वांस मिळण्यासारखी आहे. असो. असा प्रकार असल्यामुळें आपल्या मनाजोगा शरीरसंबंध आपल्या मुलांचा व्हावा ही जी मालूविठूच्या आईची साभिमान आणि उदात्त इच्छा होती ती कशी पूर्ण होते, अशी तिला मोठी काळजी होती. कारण, आपण जरी कुलीन आहों तरी कंगाल स्थितींत असल्यानें आपल्या कुलीनत्वाची माती झाली आहे, असें तिला वाटे. उघडच आहे, यस्यास्ति वित्तं स नरः कुलीनः। नाहीं तर एका दारिद्र्याच्या पायीं सर्व गुणांची माती होते. मुलें बरींच मोठीं होत चाललीं. लवकरच त्यांचीं आतां लग्नें झालीं पाहिजेत. नाहीं तर हो, नजाणो, तीं कदाचित कोठें नादावतील आणि बिघडतील, अशी तिला आतां भीति होती. तरी आपल्या उच्च कुलाला अयोग्य असा शरीरसंबंध मुळींच घडतां कामा नये असें तिचें ठाम मत होतें. यामुळें तिला तो एक हृद्रोगच लागून राहिला होता.

मागें सांगितल्याप्रमाणें मल्हारभट्टांचा त्या बंदिवासांतच अंत होऊन एक अत्यंत कळवळ्याचा घरचा सल्ला-मसलतगारच नाहींसा झाल्यामुळें या कामीं आपण कोणाचा विचार घ्यावा, आपल्या मुलांची सोयरीक, त्यांच्या गुणाला साजेल इतकेंच नाहीं, तर जगांतील त्यांच्या दर्ज्यांतही चांगलीच भर पाडील, अशी घडवून आणण्यास काळजीपूर्वक युक्ती योजणारा व निरपेक्ष खटपटीनें त्या कामीं यश मिळविणारा असा मदतगार आपल्याला कसा मिळेल या विवंचनेंत ती अगदीं चूर होती. मल्हारभट्टांचे चिरंजीव लक्ष्मणभट्टही चांगले जाणते आणि बापाप्रमाणेंच विद्वान असून आपल्या यजमानाचे खरे खरे हितचिंतक होते. तथापि बापाचा तसा शोचनीय स्थितींत घडून आलेला प्राणान्त व त्या कामीं केवळ आपल्याकरितांच त्या थोर व निरपेक्ष पंडित याचा असा बळी पडला अशी पाटलीणबाईची समजूत व त्यामुळें तिच्या मनाला होणारा खेद, याचप्रमाणें बापाच्या मरणानें लक्ष्मणभट्टांस किती तरी दुःख होत असेल याबद्दलही तिचें मन तिला सारखें टोंचीत असल्यानें लक्ष्मणभट्टांस आपण या बावतींत इतक्यांतच फिरून तसदी कशी द्यावी असा तिला संकोच वाटत असे. इकडे लक्ष्मणभट्टांचें मन आपल्या यजमानाच्या कल्याणास यत्किंचितही पराङ्मुख नव्हतें, तथापि आपल्या बापास यवनांच्या बंधांत प्रायोपवेशानें मरणाची पाळी आली व आपल्या हातून त्याच्या मुक्ततेसाठीं कांहींच प्रयत्न होऊं शकले नाहींत, या विचारांनीं अगदीं खिन्न झालें होतें. शिवाय बापाच्या अस्थी गंगेंत पोंचविण्याचा व गयावर्जन करून येण्याचा त्याचा विचार

बहुतेक ठरल्यासारखाच होता. पाटलीणबाईस ही गोष्ट माहित होती. सारांश काय कीं, पाटलीणबाईस आपल्या पुत्रांच्या सोयरिकीसंबंधी सल्लामसलत विचारण्याकरितां चांभारगोंदेकर पेढीवाले शेषोजीनाईक पुंडे यांस बोलावणें धाडावें लागलें. चांभारगोंदेकर शेषोजीनाईक यांचा व बाबजीचा कांहीं देवघेवीसंबंधानें बराच परिचय होता. शेषोजीनाईक स्वभावानें उदार आणि दयाशील असा होता. शिवाय बाबजीच्या पश्चात त्यानेंच आपण होऊन या भोंसले घराण्याशीं आपला परिचय, प्रसंगीं त्यांस पैशाआडक्याची वगैरे शक्य ती मदत करून, वाढविला होता. जातीनें ब्राह्मण असून विशेष धर्मशील असल्यामुळें पाटलीणबाई तर त्याजवर गुरूप्रमाणें श्रद्धा ठेवीत असे. मुलेंही त्यास वडिलाप्रमाणें मान देत असत आणि त्याला स्वतःला हा वेळपर्यंत संतति कांहींच नसल्यानें तोही या मुलांवर विशेष लोभ करीत असे. त्यांत विशेषेंकरून मालोजीचीं उमेदीचीं भाषणें ऐकण्याची तर त्याला विशेषच गोडी वाटे. ह्मणून तो कधींकधीं क्षुल्लक कारणानेंही आपणच स्वतः पाटलांच्या गावीं येई, आणि या तरुणबांडांशीं चार इकडल्या तिकडल्या गोष्टी करण्यांत आणि कधींकधीं त्यांना उपरोधिक भाषणांनीं उगीच चिडविण्यांत व कित्येक वेळां उत्तेजक वचनांनीं त्यांस स्फुरण आणण्यांत दिवसच्या दिवस घालवीत असे. स्वधर्माचा कट्टा अभिमानी आणि परराज्यापासून एकंदर जनसमूहाला होणारा ताप पाहून मनापासून हळहळणारा असा हा शेषोजीनाईक पुंडे मालोजीरावास चिडविण्यांत तर फारच कौतुक आणि आनंद मानीत असे. तो त्याला नेहमीं

कां राजे—' ह्मणून जरा हेल काढून आणि हंसतहंसत, अशीच हांक मारावयाचा, आणि त्यानें तशा हांकेला ओ दिली, किंवा त्याच्याकडे पाहिलेंसें दाखविलें, तर लगेच 'फुशारले! फुशारले! फुकटचेंच असेल नाहीं राजे ह्मणून घेणें अगदीं? राज्य तर पडलें आहे मुसलमानांकडे गहाण, तें सोडवा असली हिंमत तर अगोदर पाहूं? मग तरी ह्मणून घ्या राजे ह्मणून.' बरें, 'कां राजे' ह्मणतां क्षणींच मालोजीनें त्याच्याकडे पाहिलें नाहीं किंवा ओ दिली नाहीं, तर तिकडूनही लागलेंच ते असेंही हिणवावयाला तयारच, कीं, 'अजून राज्य मिळायचें किंवा मिळवायचें तें तर लांबच आहे, सध्यां तें तर ढुंकूनही पाहत नाहीं यांच्याकडे, तोंच पहा राव कसे फुगले ते. ओ सुद्धां देत नाहींत. मग खरोखरच जर रेषा उपटली तर काय विचारूं सुद्धां नका. नुसते हे दुरून पाहवयाचे-सुद्धां नाहींत आमच्यासारख्या लोकांकडे. बरें बुवा! नका देऊं आह्मांला ओ, किंवा आमच्याकडे पाहूंही नका मग; पण मिळूं द्या एकदांचें तें राज्य तुह्मांला—नाहीं, मिळवाच तुह्मीं तें—मग चालेल तुह्मी कितीही कुऱ्यांत वागलांत आमच्याशीं, आणि आह्मांला एखाद्या क्षुल्लक कारणाबद्दल शंभर वेळां नाकें घांसावयाला जरी लावलें तरी पुरवेल आह्मांला. तें आह्मी आपलें मुकाट्यानें सोसूं.' नाईक पाटलांच्या घरीं आले कीं, अगदीं पहिली हांक मारण्यापासून अशा प्रकारें हा पाडव्याच्या लिंबासारखा कडू पण परिणामीं हितकर विनोद सुरू व्हावयाचा. इकडे पाटलीणबाईकडे सर्व वेदांताच्या गोष्टी चालावयाच्या, नाहीं तर रामायणांतील रामाचा वनवास अथवा भारतांतील पांडवांचा वनवास आणि त्यांतील मुख्यत्वेंकरून कुंतीचे

वगैरे आपल्या अनाथ मुलांबद्दलचे वारंवार निघणारे उद्गार, किंवा कधीं कधीं पद्मिणी, हम्मीर, सामरसी वगैरे चितोड-च्या नरनारीरत्नांच्या गोष्टी निघावयाच्या. तेथेंही मालू-विठूंची जोडी हजर असावयाचीच. याप्रमाणें हे कधीं कधीं होणारे नाईकांचे आणि छोट्या पाटलांचे, त्याचप्रमाणें पाटलीणबाईचे आणि नाईकांचे संवाद दोन्हीही घराण्यांचा परिचय वाढवून अखंड कल्याणकारक असेच झाले. आणि ते कसे तें या पुस्तकाच्या शेवटीं शेवटीं समजेल. ह्या लग्नाच्या बाबतींत पुढें कसें करावयाचें हें विचारण्यास पाटलीणबाईस शेषोजीनाइकांवांचून दुसरी कोणतीच जागा नव्हती हें आतां वाचकांच्या ध्यानांत पुरतें आलें असेल.

---

## प्रकरण ५ वें.

एके दिवशीं मालोजी आणि विठूजी या दोघांशीं कांहीं अवांतर गोष्टी बोलत असतां त्यांच्या आईनें कांहीं प्रसं-गानें एकदम बोलण्याचा ओघ बदलून लग्नाबदल त्यांच्या मनांतील खुलासा काढण्याचा घाट घातला. ती ह्मणाली— ‘ काय रे मालू, तुला हें आतां अठरावें वर्ष संपत आलें नाहीं का?’

**मालोजी**—होय, मग त्याचें काय आतां आई तुला कारण पडलें येवढें ?

**आई**—नाहीं रे आपलें उगच ह्मटलें झालें. परवां ती रखमी ह्मणत होती कीं, त्या कुणाचीशी मुलगी मोठी चांगली आहे—

**मालोजी**—असेल, त्याचा आणि माझ्या वयाचा काय संबंध पण? आणि ती तमक्याची मुलगी अशी चांगली आहे असें रखमीला तुझ्याजवळ बोलण्याचें तरी काय येवढें अडलें होतें तें नाहीं मला कळत.

**आई**—अरे काय अडलें होतें हें काय? तिला काय? भोळी बापडी ती. शिवाय तिचा जन्म गेला आपल्या आश्रयाखालीं. तिनें आपलें आतां तूं लग्नाचा झालास असें समजून माझ्या कानावर सहज गोष्ट घातली तिला वाटली ती.

**मालो०**—हं-हं? असें काय? तर आपल्याला नाहीं बुवा त्यांत कांहीं समजत. तें आपलें तूं जाणे आणि तुझें खटलें जाणे. ( जरा लडिवाळपणानें. ) पण हें बघ आई, आपल्याला नको ती पंचाईत. आह्मांस नाहीं लग्न करायचें. कुणी पडावें त्या यातायातींत उगच? ( थट्टेनें. ) विठोबाचें कर आधीं लग्न आई. मग—

**आई**—बोलला आपला कांहीं तरी. बराच शहाणा झालास ह्मणावयाचा अलीकडे तूं तर मग मालू. ( जरा रागावल्यासारखें करून ) मी आपल्या विठूचेंच लग्न करीन आधीं हो.

**मालोजी**—तसें नव्हे ग आई. पण त्यांत रागावायला काय झालें ग?

**आई**—चल बोलूं नको उगच जीभ लांब करून. मला कळतें आहे सगळें हें तुझें वेड घेऊन पेडगांवाला जाणें, समजलास?

**मालो०**—आई रागावूं नकोस. तूं जरा ऐक तर खरें माझें. मी काय ह्मणतों तें पुरतें ऐकून घेतल्यावांचूनच जर तूं मजवर रागावशील तर माझा नाइलाज आहे.

**आई**—ऐकून रे काय ध्या पुरतें तुझें? अगदीं पहिल्याच उत्तरापासून सगळी उडवाउडवी आणि थट्टा मांडलीस तूं, नि ह्मणे मजवर रागावूं नकोस. मलाच उलटें शिकवतोस का?

**मालो**०—( पड घेऊन, ) बरें नाहीं, चुकलों मी. विचार आतां तुला काय विचारावयाचें असेल तें. आणखी तसें तरी कशाला? मला विचारावयाचें तरी काय आहे त्यांत? आपलें असें असें कर ह्मणून सांग सरळ ह्मणजे झालें. मी आपला तसा वागेन. तूं जें काय करशील तें आमच्या कल्याणाचेंच असेल अशी माझी खात्री आहे.

**आई**—आतां तर अगदींच साळसूद झालास. बराच पडून घर घेणारा बनला आहेस एकूण आतांशा. इतका ठक झाला आहेस तूं हें माझ्या नव्हतें आलें लक्षांत. बरें पण यंदांच्या लगिनसराईत कुठें तरी सोयरीक जमवावी असें मला वाटतें. तुझें कसें काय? हो, ह्या गोष्टी आपल्या तुमचे तुह्मी आतां जाणते आहां, तेव्हां त्या तुमच्या विचारानेंच झालेल्या बऱ्या.

**मालो**०—तूं रागावणार नाहींस तर सांगतों हो. खरें जर पुसशील तर मला कांहीं अजून माझें लग्न आतां झालेंच पाहिजे असें वाटत नाहीं. एव्हांपासून ती पायांत बिडी कुणीं अडकवून घ्यावी? शिवाय माझें कांहीं तसें मोठें वय झालें आहे असेंही नाहीं. आतां मी आपला कास तुझ्या भिस्तीवर निष्काळजी चैनींत आहें. लग्न केलें कीं या आज दोन वर्षें सतत मेहनत करून कमावलेल्या शरीराची माती होईल. याच चार दिवसांत कांहीं पैदा झाली तर व्हायची ताकद. ती का पुढें होणार आहे पैदा करूं ह्मटलें

तर? लग्नाचें कांहीं तसें नाहीं. तें अजून ४।६ वर्षांनीं केलें तरी चालण्यासारखें आहे. ( इतक्यांत पुंडेनाईक येतात. )

**पुंडे**—( येतां येतां ) हो अगदीं बरोबर बोलले पाटिलबुवा. आजच काय तटलें आहे येवढें ?

**आई**—वा: नाईक, आपणही पण अगदीं वेळेवर आलां शिष्याची कड घ्यायला. आतां काय? जातेंच मी आपली घरांत, झालें.

**पुंडे**—छे:, छे:, हें काय ? मला कांहींच सुद्धां माहीत नाहीं आपण काय बोलत होतां मायलेकरें तें. मीं आपलें उगच तेवढें चारसहा वर्षांनीं केलें तरी चालेल एवढेंच वाक्य ऐकिलें, आणि कांहीं तरी बोलायचें ह्मणून आपला तसें बोललों. काय तें चारसहा वर्षांनीं केलें तरी चालेल ? तें सांगाल तर खरें आह्मांला पाटिलबुवा. कायहो काय छोटे पाटिलबुवा, राजे काय ह्मणत होते ? कशाबद्दल ? तें सांगा पाहूं.

**विठूजी**—नाईक तें कांहीं विचारूं नका. आई आणि भाऊ मघांपासून भांडताहेत सारखीं. आई काय ह्मणते, कीं भाऊचें लग्न करावयाचें ह्मणून, आणि भाऊ ह्मणतो अस्सें न् तस्सें.

**पुंडे**—हं-हं? असें काय ? आतां आलें माझ्या ध्यानांत सारें. मी ह्मटलें कीं एखादें संस्थान वगैरे घ्यायचा विचार चालला असेल या बड्या मंडळीचा. हो राजे लोक बोलून चालून आपण सारे. तेव्हां उगाच हलक्यासलक्या गोष्टींची काथ्याकूट कधींच नाहीं चालायची असल्या लोकांच्या घरीं.

**आई**—पुरे मेलें तुमचें सदा न् कदा राज्य नि राजे. तुह्मीं असें आणखी कितीही हिणावलेंत ह्मणून काय होणार? मेली परटानें धुवून आणलेल्या सुडक्याची एकदां मोडलेली घडी पुन्हां तशी घालीन ह्मणेल माणूस, तर होत नाहीं. मग या तर लांबच्याच गोष्टी. मग उगच वरचेवर असें हिणवून काय अर्थ ?

**पुंडे**—इतकें कांहीं कष्टी नको व्हायला माजींनीं. हे सिंहाचे बच्चे काय न करतील मनांत आणतील तर ? कसें पाटील ?

**आई**—नाहीं तरी कुणीं सांगावें ?

**पुंडे**—मी तरी तेंच ह्मणतों. अहो, असतील बाळ तर फेडतील काळ.

**आई**—आतां कसें बोललांत ?

**पुंडे**—कसें बोललांत ह्मणजे? 'पुरुषस्य भाग्यं स्त्रियश्चरित्रं' ह्मणून ह्मण आहेना ?

**आई**—बरें तें असो ! आपण आज आलां ते अगदीं वेळेवर आलां. यंदाच्या लगिनसराईंत मालूचें कुठें जमलें तर उरकून घ्यावें असा माझा मानस आहे. याकरितां तुमच्याआमच्या विचारानें कांहीं तरी ठरवावें, कसें करायचें, काय करायचें तें, ह्मणून आपणाला मी निरोप पाठविला होता.

**पुंडे**—राजे स्वतः काय ह्मणतात ? त्यांची जशी मर्जी असेल तसें झालेलें बरें.

**मा०**—माझी कसली मर्जी त्यांत? तुह्मी वडील माणसें जें करायला सांगाल तें करायचें, येवढें आह्मांला कळतें.

**आई**—हें असलें तोंडदेखलें बोलणें मला नाहीं आवडत.



**पुंडे**—मला तर त्याचा अगदींच तिटकारा आहे.

**आई**—हो तोंडावर मळूमळू नि मागून दुसऱ्याच्या गळ्याशीं फास.

**पुंडे**—छेः, तसलें नाहीं मुळींच कामाचें. तें आपलें जेथल्या तेथें रोखठोक असलेलें बरें. बाकी तुह्मी आह्मीं कोण करणार या गोष्टी ह्मणा? ज्याचेंत्याचें बाशिंगबळ जसें बळकट असेल तसें तें व्हायचें. या सर्व ब्रह्मदेवाच्या येथल्या गांठी अगोदरच बांधून टाकलेल्या असतात.

**आई**—अहो तें तर खरेंच; पण आपण आंधळीं माणसें. आपल्याला त्या दिसतात कां चांचपल्याशोधल्यावांचून? नि मेला हा वेडा मायापाश स्वस्थ बसूं देईल का तसा दैवावर हवाला टाकून?

**पुंडे**—छे, छे, तसें कुठें चाललें आहे? अहो, आपण आपल्या शक्तीप्रमाणें आणि ज्ञानाप्रमाणें होतील ते प्रयत्न केलेच पाहिजेत. अगदींच 'असेल माझा हरी' ह्मणत बसून नाहीं चालायचें. बरें, आपण त्याचा करूं विचार आतां सावकाश. राजांच्या मनाचाही खुलासा काढून घेऊं आणि टाकूं ठरवून कसें कसें करायचें तें लवकरच. त्याची कांहीं काळजी नको करायला इतकी. स्वस्थ असा तुह्मी. आतां झाली आहे देवदर्शन संध्या वगैरेची वेळ. मी आपला उगच देवाला जातांजातां आंत शिरलों होतों. ह्मटलें आपल्याला कळेल मी आलों आहें हें—येवढ्याचकरितां.

**आई**—बरें तर मग केव्हां याल आतां?

**पुंडे**—येईन केव्हां तरी रात्रीं, नाहीं तर उद्यां दुपारीं, चांगल्या फुरसतीनें जेव्हां जमेल तेव्हां. बरें, राजेसाहेब! चला, कां छोटेसाहेब! येता कां जरा? जाऊं देवदर्शनाला.

मालू व विठू दोघेही 'चला बापडे' ह्मणून उठतात आणि तिघेही बाहेर जातात.

वरील संभाषणावरून मालोजीच्या मनांत लग्नाबद्दलच्या विचारांस कितपत थारा होता हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. कुस्तीचे शोकी तरुण या लग्नाच्या बाबींत कधींच आतुर नसतात इतकेंच नव्हे, तर ते कित्येक प्रसंगीं लग्न करण्यास फारच नाखुष असतात. कित्येकांस तर पराकाष्ठेची चीडही येते लग्नाचें नांव काढलें कीं. मालोजी जरी या शेवटच्या कडेलोटीच्या वर्गांतील नव्हता तरी लग्नाच्या बाबतींत त्याचें मन एव्हांशींच वळवणें हें काम बरेंच जड होतें. आणि तसें तें नाइकांच्याही प्रत्ययास आलें. त्यांनीं आपल्याकडून बरेंच पछाडलें त्याला; परंतु तो कांहीं दाद देईना. त्यांचा प्रश्न ऐकला न ऐकल्यासारखें करून तो मुळीं कांहींना कांहीं निराळाच विषय काढी; तथापि त्यांनीं त्याला एकदां कसें तरी करून बोलता केला, आणि त्याच्या मनांत काय होतें तें त्याला स्पष्ट बोलून दाखविण्यास सांगितलें. मालोजीनें बरेंच आढेवेढे घेऊन शेवटीं असें सांगितलें कीं, जर एखाद्या मोठ्या घराण्यांतील मुलगी मिळेल तर मी लग्न करण्यास तयार आहें; नाहीं तर उगाच एखाद्या गरिबाची पोरगी नाहीं करायची आपल्याला.

पुंडे—असें कसें उलटें ह्मणतां हें पाटिलबुवा? तुह्मी आतां मोठे झालां. आतां या गोष्टी तुह्मांला कळाव्या ह्मटलें ह्मणजे. अहो, 'मुलगी करावी गरिबाची आणि द्यावी श्रीमंताकडे' अशी लोकांत एक ह्मण आहे ती उगीच असें का समजतां आपण?

**मालो०**—तशी ह्मण आहे ती मला ठाऊक आहे, पण तसा काळ कुठें आहे आज? क्षत्रियांनीं जमीन कसावी का? पण आज आह्मी कसतों आहों. तेव्हां त्या ह्मणीकडे लक्ष देऊन काय उपयोग?

**पुंडे**—तरी पण आपला आपण आपल्या फायद्याचें कोणतें, तोट्याचें कोणतें याचा तर विचार केला पाहिजे? कां आपली उगाच उचलली जीभ लावली टाळ्याला—असें करायचें आणि तसें करायचें ह्मणून?

**मा०**—कां नाहीं मिळावयाची ह्मणतां होय नाईक एखाद्या थोरा मोठ्याची मुलगी आह्मांला? आह्मी ह्मणजे अगदीं भाजीपाला झालों काय? परक्यांची चाकरी करूनच ब-डेपणा गाजवीत आहेत कीं नाहींत अलीकडचे सारे सरदार. मग झालें तर, त्यांची एवढी मिजास कसली?

**पुंडे**—चाकरी करून असो कीं, कसेंही असो. आज पागा आहेत ना त्यांच्या घरीं? पालख्या, मेणे, दासदासी, होय नव्हे जें सर्व तें त्यांच्या घरीं आहे, तें तुमच्या घरीं कुठें आहे? त्यांच्या त्या गोत्रांतल्या मुलींना तुमच्या या उघड्या कारभारांत काय सुख लागणार आहे? आणि त्यांच्या त्या अमीरी मिजासी संभाळणें तर तुमच्या हातून मुळींच व्हा-यचें नाहीं. अहो राव त्या बायका नव्हेत, ते केवळ आप-ल्यासारख्या गरिबांच्या गळ्याशीं फांस, हें कसें नाहीं येत तुमच्या ध्यानांत?

**मा०**—तें कांहीं असलें तरी आपण तर आपल्या म-नाचा निश्चय केला आहे कीं, भिकाऱ्याची पोरगी कराय-चीं नाहीं. मग काय होईल तें होईल.

**पुंडे**—आणि माजींनीं जर तुह्मांला न विचारतां आपल्या मुखत्यारीनें एखादी मुलगी ठरविली तर मग ?

**मा०**—मग काय आमचा इलाजच नाहीं तिथें. पण आई असें करील असें मला नाहीं वाटत. बाकी ती पूर्ण मुखत्यार आहे तसें करायला.

**पुंडे**—एकूण राजे, आपली उडी मोठी आहे ह्मणायची या लग्नाच्या कामांत. बाकी तुमचें काय? आईनें केलेलें नाहीं आवडलें तर तुह्मी दुसरें लग्न ठोकाल. तुमच्यांत पुष्कळ बायका असतात एकेकाला आणि ह्मातारी तर काय आतां?—पिकलें पान. केव्हां गळून पडेल याचा काय नेम आहे?

**मा०**—नाईक, ही अशी थट्टा करणें शोभत नाहीं आपल्यासारख्याला आतां ?

अशा प्रकारें हें संभाषण बराच वेळ चाललें होतें. नाइकानां पाहिजे तो सर्व खुलासा मालोजीकडून झाल्यावर त्यानीं पाटलीणबाईंना देण्यायोग्य तसाच सल्ला दिला. कारण मालोजीची महत्वाकांक्षा नाइकांस मनापासून कौतुकास्पद आणि आनंददायक अशी वाटत होती. त्यांनीं मालोजीला पुरतें ओळखलें होतें, आणि हा पुरुष केव्हां तरी आपल्या कुळाचा भाग्योदय खास करील असें मागेंच त्यांच्या मनानें घेतलें होतें, आणि आतां तर तें त्यांचें मत जास्तच दृढ झालें. मालोजीचा एखाद्या सरदारघराण्याशीं आपला शरीरसंबंध जुळावा ह्मणून जो विचार होता, त्याचा भावार्थ त्यांच्या पूर्णपणें लक्षांत आला, आणि त्यांनीं तो पाटलीणबाईस उत्तम तऱ्हेनें समजावून सांगितला. पाटलीणबाईसही आपल्या मुलाचे हे थोरपणाचे विचार ऐकून

आनंद वाटला, तथापि तिला ते विचार शेवटास जाण्याबद्दलची विशेष खात्री वाटेना, आणि आपल्या वृद्धावस्थेमुळें कदाचित् आपल्या डोळ्यांचें पारणें कसें फिटेल ह्मणून तिला मोठी चिंता वाटली. तथापि तिनें देवावर भरंवसा ठेवून आपल्या मुलाचे मनोरथ पूर्ण करण्याबद्दल कुलस्वामी शंभुमहादेवाला नवस केला आणि ती स्वस्थ बसली.

---

## प्रकरण ६ वें.

शिंगाणापुरास शंभुमहादेव ह्मणून एक पुरातन शिवस्थान आहे. उत्तरेस राजस्थानांत जसें एक लिंग तसा दक्षिणेंत हा शंभुमहादेव. हा सर्व दक्षिणेंतील मराठे क्षत्रियांचा कुलस्वामी. शंभुमहादेवाच्या जत्रेस सर्व महाराष्ट्रांतून आबालवृद्ध मराठे लोक हटकून येतात. कित्येक नवस फेडण्याकरितां, कित्येक नवस करण्याकारितां, कित्येक वार्षिकवारीक, कित्येक व्यवहाराच्या यात्रेस आणि कित्येक तो आपला कुलस्वामी ह्मणून निर्हेतुक दर्शनपूजनास; असे हजारों लोक तेथल्या यात्रेस जमा होतात. देशावर या जत्रा ह्मणजे ब्राह्मणेतर जातींचा त्या त्या प्रांतांतील जमाव एकत्र व्हावयास मोठें साधन आहे. बिरोबा, खंडोबा वगैरे देवस्थानीं जत्रेस ब्राह्मणांचा बहुतेक विटाळच. परंतु शंभुमहादेव, तुळजापूर असल्या देवस्थानांस ब्राह्मणही पुष्कळ येतात, आणि कित्येक ब्राह्मणांचींही हीं दैवतें आहेत. या जत्रांमधून अनेक तऱ्हेचा प्रांतिक व्यापार चालत असतो. जत्रांच्या जागीं मोठा बाजार भरतो. त्यांत गुरें, मातीचीं भांडीं, धातुपात्रें, आणि आसपासच्या गांवांतून होणारे

शेतीचे आणि कारागीरीचे सर्व उत्तम पदार्थ या जत्रेच्या जागीं विकावयास यावयाचेच. कुस्तीचा आखाडा ही एक बाब या जत्रांमधून अवश्य असावयाचीच, आणि त्या आखाड्याकरितां तरुण मंडळी मोठ्या हौसेनें तेथें जमतात. शिवाय सर्व प्रकारचे खेळ तेथें आलेले असतात. कोठें एडक्यांच्या, कोठें हल्यांच्या, अशा टकराही तेथें पहावयास मिळतात. आमच्या माल्लूजीविठूजींचाही अलीकडे दोनतीन वर्षें या जत्रेस जाण्याचा परिपाठ पडला होता. यंदां तर मालोजीरावाच्या मनांतून शंभुमहादेवाच्या जत्रेंतील जंगी आखाड्यावर, नांव घेईल त्याशीं कुस्ती करून जय संपादण्याचें होतें. त्याला स्वतःही यंदां फार उमेद होती, आणि त्याच्या गांवच्या सर्व तालीमबाजांनींही त्याला त्या कामीं पूर्ण भर दिली होती. कारण त्यांची अगदीं खात्री होती कीं पाटिलबुवांस चीत करणारा गडी क्वचित्च सांपडेल. पाटिलबुवांच्या दमछाकीबद्दल आणि चपलता व पेंच यांबद्दल त्यांना चांगलाच भरंवसा असे. त्यांना वाटे कीं पाटिलबुवांवर बजरंगबलीची पूर्ण कृपा आहे. त्यावांचून ही असली शरीरसंपत्ति आणि मल्लविद्येंत कुशलता असावयाचीच नाहीं असा त्यांचा समज होता.

इकडे जयपाळरावाचाही यंदा शंभुमहादेवाच्या जत्रेस जाण्याचा निश्चय झाला होता. परंतु त्या ठिकाणीं भेट झाली तरी मालोजीशीं कुस्ती धरण्याचामात्र त्याचा विचार नव्हता. मात्र तेथें मालोजीचा खेळ आपणास जर पाहावयास मिळेल तर मोठी बहार होईल असें तो मनांत ह्मणत असे. त्यानें जेव्हां आपला शंभुमहादेवाच्या जत्रेस जाण्याचा विचार आपल्या बायकोस कळविला तेव्हां तिनेंही

'मी आपल्याबरोबर येणार ' असा त्याजजवळ हट्ट धरला. दिपाबाईला जेव्हां ही बातमी कळली, तेव्हां 'दादा मलासुद्धां जत्रेला यायचें बरें का,' ह्मणून तिनेंही आपली मनीषा दाखवली. जगपाळरावाला या बायकांस बरोबर घेऊन जाण्याचें मोठें संकटच पडलें. त्यानें दोघींपाशीं पुष्कळ फरगडे फोडले. 'पुन्हां केव्हां तरी जातां येईल, आतांच काय तटलें आहे?' याप्रमाणें बायकोला आणि 'तूं आपली बाबांनाच विचार, आईला विचारून ये हवी तर! बाकी आमचें काय? आह्मी आपले सडे सोटभैरव. आमच्याबरोबर तुझें कसें जमणार? मी तिला नेत नाहीं, आणि मग तुला एकटीला कशी घेऊन जाऊं? तुला नेलें ह्मणजे मला तिला नेलेंच पाहिजे. कारण ती कांहीं मग ऐकणार नाहीं.' अशा प्रकारें दिपेला त्यानें धुडकावण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; पण तो सर्व व्यर्थ गेला. दिपाबाईनें आणि तिच्या भावजईनेंही ही गोष्ट योग्य वेळ पाहून जगपाळरावाच्या आईपाशीं काढली, आणि त्यांत दिपेनें तर विशेषच हट्ट घेतला. दादानें आपल्याला आणि वहिनीलाही बरोबर न्यावें ह्मणून दिपेच्या हट्टाचा उपयोग झाला. आईनें नाइकांस सांगून सर्वांचाच जत्रेला जाण्याचा बेत कायम करविला. मग काय? मोठ्या थाटाचीच स्वारी निघण्याची तयारी चालू झाली. नाइकांच्या मनानें यंदां जत्रेंत बराच खर्चवेंच करण्याचें घेतलें, आणि त्यांनीं आपल्या सर्व वैभवाचें प्रदर्शन या सालीं शंभुमहादेवावर करण्याचें ठरविलें.

या जत्रेच्या अगोदरच्या ४।५ वर्षांत महाराष्ट्रांत काळ व परिस्थिति यांच्या मानानें विशेष स्वास्थ्य होतें ह्मणण्यास

कांहीं हरकत नाहीं. सुलतानपंचकाच्या मारामाऱ्या तालीकोटच्या लढाईकारितां ( १५६५ सालांतील ) झालेल्या ऐक्यामुळें बंद पडल्या होत्या. वरतीं दिल्लीच्या मुसलमान पादशाही तक्तावर असलेल्या अकबरास दक्षिणेकडे डोळा करण्यास घरच्या भांडणामुळें आणि चितोडच्या कारस्थानामुळें मुळींच फुरसत सांपडली नव्हती. त्यांतही विशेषेंकरून अहमदनगरच्या सुलतानी तक्तावरील मूर्तिजा दुसरा हा शांतताप्रिय आणि विलासी असल्यामुळें आणि अलीकडे अहमदनगर, विजापूर वगैरे बहुतेक दक्षिणी बादशाहींतील बऱ्याच मोठमोठ्या हुद्याच्या जागा, लष्करी त्याचप्रमाणें दिवाणीही, मराठे सरदार आणि ब्राह्मण मुत्सद्दी यांच्या वांट्यास आल्या असल्यामुळें जिकडे तिकडे चांगलेंच स्वास्थ्य नांदत होतें. यावरून असें मात्र मानावयाचें नाहीं कीं, गोवधादि अनन्वित कृत्यें अगदीं बंद पडलीं होतीं, शेतकरी लोक निर्भयपणें आपल्या पिकांचा उपभोग घेऊं शकत होते; किंवा स्त्रियांची अब्रू कोठेंही आणि केव्हांही अगदीं सुरक्षित होती. ते प्रकार चालूच होते. मराठे सरदारांच्या आणि ब्राह्मणी मुत्सद्यांच्या दहशतीनें मोठमोठ्या शहरांतून वगैरे या प्रकारांना कांहीं थोडा आळा घातला होता. बाकी हे आवडते खेळ खेळल्यावांचून त्या शिरवानष्टांस करमतच नसे, आणि ते आपली हौस राजधानीपासून जरा दूरच्या प्रदेशांत मनमुराद फेडून घेत असत. 'जित्याची खोड मेल्यावांचून कधीं जावयाची नाहीं' अशी मुळीं ह्मणच आहे. तिला अनुसरून वरील प्रकारचे आपले ते जीवघेणे खेळ मुसलमानांनीं कधींच टाकिले नाहींत. असो ! कसेंही असलें तरी अलीकडील ४।५ वर्षांत

हिंदूवरील जुलमाला आणा दोन आणे उतार होता, इतकें तात्पर्य आपल्यास घेतलेंच पाहिजे, हें खास, आणि त्याचा परिणामही या निरनिराळ्या ठिकाणीं भरणाऱ्या हिंदूंच्या जत्रेंतून आणि मेळ्यांतून दिसावयास लागला होता. पूर्वीं-पेक्षां या प्रत्येक ठिकाणीं जास्त भक्तसमुदाय जमूं लागला होता. बाजार भरगच्च भरून देवघेव वगैरेही फारच वाढली होती. पाहतांच मनाला आनंद देणारी अशीं पुष्ट आणि सुंदर गुरें या जत्रांतील बाजारांत हजारोंवारी विकावयास येऊं लागलीं; आणि वर्षानुवर्ष ती संख्या चांगलीच वाढत असे. बैल, गाई, खोंड असे मारू येत, कीं यंव! मातीचीं भांडीं, लांकडीसामान आणि विशेष कळा-कुसरीच्या वस्तू शंभर शंभर कोसांवरूनही अतोनात येत असत. या व अशाच अनेक कारणांनीं या सालच्या शंभुमहादेवाचे जत्रेस पुष्कळच मोठमोठे सरदार वगैरे लोक जमण्याचा संभव होता, आणि तसें झालेंही. या जत्रेच्या व्यवस्थेबद्दल तेथील पुजारी, बडवे आणि इतर लोक यांची खूप तयारी चालली होती. आगाऊ येणाऱ्या वर्दीची सोय करण्यांत आणि आपापले अडसट्टे आणि संधानें जुळविण्यांत त्यांची अगदीं धांदल उडून गेली होती. कांहीं मोठ्या लोकांचे थोडथोडे सरंजाम आगाऊच येऊं लागले होते. कांहींचीं छपरें, कांहींचे मांडव, कांहींचीं पालें, त्यांचे त्यांचे पुढें धाडलेले लोक, कोणी माचीखालीं, कोणी कोठें पायथ्याशीं वगैरे आपापल्या सोईची जागा पाहून, उभारण्यास लागले होते. वरतीं धान्य वगैरे हरएक सामान खालून चढवावयाचें असल्यानें, तीही रहदारी सारखी चालू झाली होती. अशा प्रकारें इतर दिव-

सांत केवळ निर्जन आणि वैराण असणारा शंभुमहादेवाचा डोंगर ह्मणजे सध्यां एक अगदीं शहर बनत चालला होता. जणूं त्या जड डोंगरास येथून तेथून चैतन्य येत चाललें होतें, आणि जिवंत चालतेबोलते असून बुद्धिवान परंतु आळसांत घोरत पडलेल्या माणसांस तो डोंगर या वेळेला स्वतः जड पाषाणमय असूनही आपल्या हालचालीनें वेडावतोच कीं काय, किंवा त्यांच्या आळसांतून त्यांस जागें करून उद्योग करायला सांगतो कीं काय असें तटस्थवृत्तीनें विचार करणारांस वाटत होतें; किंवा महाराष्ट्रांतील पाषाणही किती सचेतन, सतेज आणि कार्यक्षम आहेत, हें प्रसंगानें मुसलमानांस दाखवून असल्या देशावर आपली जुलूमजबरी 'आणि हम करेसो कायदा' हा न्याय किती दिवस सुखेनैव चालूं शकेल असा प्रश्न तो डोंगर स्पष्ट विचारीत होता. उघडच आहे कीं, उलटी अंबार बनण्याला एक क्षणही लागणार नाहीं, असेंच या वेळीं हा शंभुमहादेवाचा डोंगर अगदीं दौंडी पिटवून सांगत होता. असो; या केवळ कल्पना आहेत. तथापि त्या मागील संस्कारानें भरलेल्या आणि पुढील सत्याच्या सूचक आहेत हें मात्र विसरतां कामा नये. बाकी त्या सत्यगोष्टीच्या रूपानें पुढें येण्यास किती काळ लागतो हें पाहणें आहे. वाचकांनीं उतावीळ न होतां सर्व कांहीं दमादमानें घेतलें तर तोही खुलासा त्यांना मिळेल. त्यांनीं हिशेब ठेवण्यास मात्र चुकतां कामा नये. नाहीं तर पुढें जत्रा तुडुंब भरलेली असतांनां तेथें घडणाऱ्या नानाविध गोष्टी पाहतां पाहतां भान नाहींसें होऊन मुद्दल

गमावून बसाल, येवढी सूचना देऊन ठेवतों, आणि पुढल्या प्रकरणास हात घालतों.

---

## प्रकरण ७ वें.

सर्वांस, विशेषेंकरून तरुण विलासीजनांस अतिशय पसंत वाटणाऱ्या वसंताचे दिवस होते. त्यांतही चैत्राचा महिना, आणि पंचपंचउषःकालाचा समय. मग त्या कौतुकास्पद आणि आल्हादजनक सृष्टिवैभवास काय विचारतां? सर्व बाजूनें ऊत आलेला! शंभुमहादेवाची जत्रा या चैत्र महिन्यांत शुद्ध पंचमीपासून पौर्णिमेपर्यंत भरत असते. या पवित्र सह्यशिखरावर चढूं लागल्यापासून तों वर जाईपर्यंत मार्गांत अनेक तऱ्हेनें हें सृष्टिवैभव पाथिकांच्या नयनांस संतोषवीत असतें. या शिखरावर जाण्याचा चढाव मुख्य शिखराच्या पायथ्यापासून सुरू न होतां त्या शिखरापासून तो बराच लांब ह्मणजे चांगला ४।५ कोसांवर सुरू होतो. दरम्यान एक दोन खेडीं आणि २।३ लहानसहान वाडया लागतात. या जत्रेच्या दिवसांत हीं खेडीं आणि ह्या वाडया अगदीं गजबजलेल्या असतात. खुद्द शिंगणापूर तर अतिच भरगच्च आणि गजबजलेलें असतें. ह्या सर्व रस्त्याभर घोडीं, मेणे, पालख्या यांची सारखी रहदारी लागते. तथापि पायीं चालणारांची गर्दी फारच असते. त्यांत कित्येक वारकरी असतात. त्यांच्याजवळ त्यांची पताक असावयाची. कित्येक नंगे गोसावी असतात. कित्येक गरीब बायका आपलीं मुलें कडेवर, खांद्यावर अथवा पाठुंगळीस बांधून

त्यांस देवाच्या पायांवर घालण्यास नेत असतात. अशा या नाना प्रकारच्या यात्रेकरूंतच एक गरीब दीन अनाथ मुलगी आणि एक मुलगा अशीं दोघें वाट क्रमीत होतीं. हीं अनाथ ह्मणण्याचें कारण कीं, ह्यांचीं वयें बारा आणि चवदा वर्षांवर नसून ह्यांच्याबरोबर ह्यांच्या ममतेचें असें तिसरें कोणी माणूस नव्हतें. असल्या लहान मुलांनीं शंभु-महादेवाच्या जत्रेस एकटें जावयाचें ह्मणजे जिवंत असणाऱ्या कोणत्याही आईबापास अथवा वडील माणसास रुचावयाचें नाहीं. एक तीं त्यांस मुळींच पाठवणार नाहींत; नाहीं तर बरोबर स्वतः कोणी तरी येतील. हीं बहीणभावंडें—हा आमचा केवळ तर्क आहे, परंतु तो बहुशः चुकणार नाहीं असें वाटतें—कुलीन घराण्यांतील असावीं असें त्यांच्या चेहऱ्यावरून तेव्हांच वाटत असे. वर्ण जरी उत्तमांतला गौर नव्हता, तरी काळ्याकडे तर त्यांची बिलकुल झांकही नव्हती. दोघांचीही मुद्रा एकंदरींत पाणीदार दिसे, तथापि प्रवास त्यांस बराच जाचला असावा, असें खात्रीनें अनुमान होत होतें. अंगावरील बेतापुरतेच कपडे धुळीनें वगैरे मळले होते आणि प्रथम ते अगदींच गलिच्छ आहेत असा पाहणारांचा ग्रह व्हावयाचा. परंतु चाणाक्ष पाहणाराच्या, जरा जास्त लक्ष पोंचवतांच, असें लक्षांत आल्यावांचून राहिलें नसतें कीं, ते काटलेले आणि खरोखरच घामट नव्हते, तर चांगलेच स्वच्छ होते. शिवाय अशीं कांहीं लक्षणें त्यांच्या चेहऱ्यावर होतीं कीं, हीं दोन्ही मुलें अगदींच सामान्य आणि गांवढळ नसून कोणा तरी गर्भश्रीमंताच्या कुसव्यांत यांचें जनन झालेलें असलें पाहिजे, असा ग्रह व्यवहारांत वागलेल्या पाह-

णाराचा तरी झाल्यावांचून राहू नये. हीं दोन्हीं मुलें इतर घोळक्यांत न चालतां जरा लांबूनच आणि भीतभीत अशीं त्या घोळक्यांतील लोकांच्या मार्गावर लक्ष ठेवून एकमेकांचा हात धरून चालत होतीं. त्यामुळें आणि अजून जरा अंधेरच असल्यामुळें धोरण न राहून तीं वाट चुकलीं होतीं. तीं वरचेवर थकत, आणि त्यांतही ती मुलगी विशेष थकत असे. ती थकली किंवा तो थकला तरी दोघांलाही एक पळभर तरी जमीनीला बूड टेकावेंच लागे. भाऊ रागावेल कीं काय, ह्मणून कित्येक वेळां आपण थकल्यें असें ती त्यास न सांगतां तशीच रखडत चालत असे. पण तसें किती निभतें ? नाइलाज झाला ह्मणजे तिला ह्मणावेंच लागे कीं, ' भाऊ जरा दम खाऊं दे, माझ्यानें आतां नाहीं पुढें चालवत. ' तोही दमत नसे असें नाहीं, तथापि किती केलें तरी तो पुरुष आणि ही अबला. तेवढ्या फरकापुरतें त्याचें पाऊल थोडेंफार पुढें असे इतकेंच. बहिणीनें थांब ह्मटलें कीं, मनांतून ह्यालाही बरेंच वाटावयाचें. परंतु थोडीशी पोराच्या अल्लड स्वभावाच्या ऐटीखातर ' दमलीस इतक्यांत, हें असें शंभर जागीं बसून कसें पोंचावयाचें शंभुमहादेवाला? ' असें ह्मणत स्वारी बसायचीच तिच्या पाठोपाठ मटकन्. ९।४ क्षण गेले नाहींत तो मुलगी फिरून हुशारी आणून ( नुसतीच ) उठायची आणि ' चल भाऊ, आतां चालेन अं मी तुझ्या बरोबर ' असें ह्मणावयाची आणि चालूं लागावयाची. भाऊही मग ' बसबस आणि उठउठ हें ग कसलें हें तुझें?' असें ह्मणत उठवयाचा आणि मोठ्या शिताफीनें फिरून तिच्या पुढें दोन पावलें चालूं लागावयाचा.

अशीं हीं त्या सर्वेश्वराचीं दोन्ही लेंकरें आज आपलें कोणतें गाऱ्हाणें सांगण्याकरितां त्याच्याकडे चाललीं आहेत हें त्याचें तोच जाणे, आणि तो सर्वसाक्षी भक्त-वत्सल परमेश्वर या आपल्या छोटया भक्तांचें हरतऱ्हेनें कल्याण करण्याकरितां सारखा उपाय योजीतच असला पाहिजे. जवळपासच या जत्रेस जाणाऱ्या हजारों लोकांपैकींच कोणाच्या तरी अंतर्यामीं प्रेरणा करून ह्या मुलांकडे त्यांचें लक्ष लागण्याची तो बहुधा तजवीज करीत असेल. कदाचित् त्याला अजून कोणी योग्य पुरुष या मुलांच्या आसपास चालणाऱ्यांमध्यें दिसला नसेल, किंवा खरोखरच तसा कोणी नसेलही अजून हप्याटप्यांत आलेला. तो दूर असला तर त्यास जवळ आणण्याकरितां लवकर लवकर चालण्याची स्फूर्ती तो त्याच्या मनांत उत्पन्न करील. कसेंही करील पण तो अनाथाचा नाथ हें आपलें ब्रीद कधीं-ही सोडावयाचा नाहीं. बहुधा अशा प्रकारची मुग्ध खात्री आमच्या या मुलांचीही होती, आणि त्या जोरावरच तीं हा कष्टतर प्रवास कंठीत होतीं. याप्रमाणें तीं दोघें चाललीं असतां, मुलीला ठेंच लागली आणि ती "अग आईग" ह्मणत मटकन् खालीं बसली; आणि ती भरतीची वेळ असल्यामुळें त्या ठेंचेंतून निघणारा रक्ताचा प्रवाह पाहून तिला घेरीच आल्यासारखें झालें. तिनें भावाला हांका मारल्या नाहींत तरी त्याचें तिच्याकडे सारखें लक्ष असल्यामुळें ती खालीं बसतांच घाबऱ्या घाबऱ्या तोही तिच्याजवळ आला, आणि ती तिची ठेंच आणि त्यांतून निघणारा रक्ताचा पूर —कारण त्या लहान मुलांस तो पूरच होता— पाहून त्याला भीति वाटली. तरी त्यानें लगलेंच तिला

कुरवाळून जवळची थोडीशी माती घेतली आणि तिच्या त्या ठेंचेवर टाकून, तो तीस ह्मणतो, "ताई, अशी घाबरूं नकोस; त्यांत भिण्यासारखें कांहीं नाहीं. ह्या मातीनें किनई तेव्हांच रक्त बंद होतें. आतां नाहीं यायचें आणखी रक्त. आपण आतां त्या–तें पाहिलेंस कां त्या जवळच्याच झाडींत गांव दिसतें आहे तें बघ–तिथें गेलों किनई ह्मणजे त्यावर तेलपाण्याची पट्टी लावूं, किंवा बिब्बा घालूं, ह्मणजे झालें." असें तो तिच्याशीं बोलतो आहे, ती नुसती मानेनेंच त्याच्या बोलण्यास हुकार देत आहे, मधून मधून वाऱ्याच्या झुळकेनें त्या जखमेंतून कळ आली कीं, 'अग आईग' अशी कळवळते आहे, तोंच, एक मुसलमानाचा तरुण पोरगा तेथें येऊन ठेपला. या दोन मुलांपासून दहा पांच पावलें लांब असतांनाच या दोन मुलांकडे पाहून तो तरुण एकदम थबकला आणि एक क्षणभर नीट न्याहाळून पाहून 'ओहो यही शिकार हमारी' असें मोठ्या आनंदानें ह्मणून एकदम वाघाप्रमाणें उडी टाकीतच त्यांच्याजवळ आला. तो जवळ आलासें पाहतांच 'भाऊभाऊ, हा कोणरे?' असें ती त्याला ह्मणाली. भावानेंही त्याला पाहतांच जरा कावरीबावरी मुद्रा केली, आणि 'ताई असेना कां कोणी' आपल्याला काय करायचें आहे? चल आपण आपले जाऊं आतां हळूहळू.' असें तो तिला ह्मणाला. तीही 'भाऊ जरा दम खारे– नको पण, चलच–ही मी उठल्येंच.' असें ह्मणून चालूं लागली. तें पहातांच तो तरुण मुसलमान त्यांच्यापुढें झाला आणि खालीलप्रमाणें त्या मुलांचा व त्याचा संवाद सुरू झाला.

**मुसल०**—बेटा, तुह्मी इतके छोटा अदमी चालला किदर.

**संभाजी**—( हें त्या मराठ्या मुलाचें नांव. ) आह्मीं चाललों शंभुमहादेवाला.

**मुस०**—शंभुमहादेवका डोंगर तो बडा कठण और उंचा. तुह्मी कैसे उपर चढाल.

**रमा**—( हें त्या मुलीचें नांव. ) आह्मी जाऊं आपलीं हळूहळू.

**मुस०**—हम् ऐसा ह्मणतो तुम् नहीं चढोंगे. हमारे बरोबर तुह्मी चलशील तो आह्मी तुह्माला आदमी देईल और ऊपर पोचता करील.

**संभा०**—नको, आह्मी आपलीं जाऊं अशींच.

**मुस०**—छोकरे ऐसा मत करो. आमचा सुनो. चलो हमारे साथ. ऐसे छोटे बच्चे लोक पडेंगे डोंगरपर और मर जावेंगे तो हमकू ये अच्छा नहीं लगता. हम नहीं जाना देल तुमकू.

याप्रमाणें हळूहळू वाढल्या सवनावर येऊन ही मुसलमान तरुणाची स्वारी धाकदपटशा द्यायला लागली. प्रथम त्याच्या त्या दरडावण्याकडे फारसें लक्ष न देतां हीं दोन्हीं मुलें एक एक पाऊल वाट चालूं लागलीं. परंतु खांसाहेबांची स्वारी जास्तच चवताळली आणि ‘खडे रहो, एक पाव भी आगे मत बढो’ ह्मणून मोठ्यानें ओरडून आणि आपल्या हातांतील सोटा पुढें करून त्या दोन मुलांस त्यानें आडविलें. आडवितांच तीं थबकलीं. इकडे रमा तर अगदीं बावरून रडण्याच्या बेताला आली आहे असें दिसलें.



**सं०**–( त्यानें आपणास अडविलें असें पाहतांच. ) खांसाहेब, हा असा जुलूम कां ह्मणून तुमचा आमच्यावर? आह्मी कांहीं तुमच्याबरोबर येणार नाहीं. आह्मी डोंगरावरून पडलों तर त्यांत तुमचें काय गेलें? तुह्मी सोडा अं. उगाच पोरें पाहिलीं ह्मणून आपलें दरडावयाचें हें काय? थट्टाथट्टा ह्मणून किती करावी? जीव घेण्याची थट्टा काय उपयोगी असली? सोडा वाट. आह्मांला जाऊं द्या. चल ग ताई, तूं भिऊं नकोस त्यांच्या धमकावणीला.

**मुस०**–छोकरा होकर बहोत धूम मचाता है! चुप बैठ. खालीपिली मर जावेंगे नहीं तो. चलो हमारे साथ. हम सुलतानके सिपाही है. उन्का हुकूम है, सब् छोटे छोकरे या छोकरी लोगकू नही जाने देना ऊपर; जो उन्के साथ बडे आदमी होएंगे तो ठीक, नहीं तो बस पकड रखना.

**संभा०**–ठीक आहे, आह्मी आपले या जवळच्या गांवांतच राहूं, नाहीं जाणार वरतीं डोंगरावर, मग काय तुमचें ह्मणणें ?

**मुस०**–नहीं-नहीं. हम नहीं तुमकू एक पावबी उठाने देएंगे. यह छोटी छोकरीकू तुम भगाते हो. इस्कू हमारे तावे करो और तुम जाव चाहे उदर. ( स्वगत. ) क्या परी है अस्मानकी ? बस ये जो हात आवे तो काम हुवा अपना.

**संभा०**–काय ? ही माझी बहीण नव्हे ? मी इला पळवून नेतों आहें ? ताई होय का ग ?

**रमा**०—( रडत. ) नका हो खांसाहेब. मी तुमच्या पायां पडतें. हा माझा खराखरा भाऊच आहे, आणि मी याची बहीण आहें. देवा ! आई जगदंबे !

**मुस**०—नहीं, तुम झूट बोलती है. बस, हम नहीं सुनते ये कुच. तुम चलो हमारे साथ. कैसी खुल रही है ये चांदणी माफक. जो रोती है तो बी इस्की चमक और खुबसुरती बढती है ऐसाही मालूम होता है. ए परी, जो तु मेरे कब्जे आवेगी तो तुजपरसे यह सब दुनिया कुर्बान करूंगा.

**सं**०—(कांपत कांपत.) खानसाहेब, कां तुह्मी आह्मांला छळतां ? आह्मांला जाऊं द्या. ही माझी ताई किनई तुह्मांला पाहून आणि तुमच्या या दरडावण्या ऐकून फारच भ्याली आहे. आह्मांला छळून तुह्मांला काय मिळायचें आहे ? आह्मी गरीब माणसें. मी तुमच्या पायां पडतों. (तसें करतो.)

**मु**०—अबे चल, कुरनिसात करनेवाला. ( ह्मणून पायानें लोटून देतो. ) ये हमारे हात आवेला कबूतर हम छोडनेवाले नही. ( तिच्याकडे. ) अए परी, चल मेरेसाथ. तुजे ऐसी मिजासमे और आराममे रखूंगा के जैसी सुलतानकी बीबी.

**रमा**० मेल्या, चांडाळा, कुणालारे बिब्बी ह्मणतोस ? तुझी बिब्बी होण्यापेक्षां मेल्या मी जीव देईन समजलास ? मुकाट्यानें आह्मांला जाऊं दे नाहीं तर बघ. आतां उजाडलें आहे चांगलें. ती पहा मागून पुष्कळ माणसें येत आहेत. मी बोंब मारून आरडून ओरडून मरेन. ( दूर होत्सपटून भेलेल्या भावास. ) भाऊ, नको त्या मेल्याच्या पायांबियां पडूं तूं. त्या मांगाच्या कां कांहीं दयामाया यायची आहे ?

आपल्या बाबांची आणि आईची काय दशा केली या मेल्या मांगांनीं? त्यांनीं नाहीं का जीव दिले यांच्यापुढें? तसेच आपणही देऊं.

भाऊ—ताई, काय करूं ग? आज या वेळेला माझ्या हातांत एखादें हत्यार पाहिजे होतें, ह्मणजे मी जरी एवढासा लहान आहें तरी याला दाखविला असता कसा काय तडाखा असतो मराठे बच्चाचा तो. (इकडे तिकडे पाहून.) धांवा हो धांवा, कोणी लवकर धांवा, आणि या दीन मुलांना या माजलेल्या लांड्याच्या हातून सोडवा.

मुस०—क्यंव बे बहोतसी लंबी जबान करता है? अच्छा, अब मारो बोंब! हम देखते है.

असें ह्मणून तो त्याच्या अंगावर धांवला. शंभूनें धोंडा उचलला, आणि त्याच्याकडे फेंकला तो त्याला नाकावर लागला आणि जरा हायहाय करीत खानसाहेब उभे राहिले, तों शंभूनें रमेला पळण्याची इशारत केली तशी ती पळूं लागली. इतक्यांत त्या मुसलमानानें मोठ्यानें 'जलदी आव' ह्मणून आरोळी ठोकली तों आणखी पांचचार मुसलमान दबा धरून बसलेले आले आणि त्या दोन मुलांची वाट अडवण्याचा आणि त्यांस धरण्याचा प्रयत्न करूं लागले. शंभु एकावर एक धोंडे असे जोरानें भिरकावूं लागला कीं, त्यांस पुढें येण्याचें भयच वाटूं लागलें. रमा निकरानें परत पळत येऊन शंभूस गांठीत होती; पण तिच्या आणि त्याच्यामध्यें शेरखान आडवा आल्यामुळें ती हारिणी जागच्याजागीं अगदीं जाळ्यांत सांपडल्यासारखी झाली. 'भाऊ-भाऊ' ह्मणून ती वरचेवर हांक मारूं लागली. दम खा, धीर धर, अशाच हुलकावण्या दाखव जरा यांना, ह्मणून तो तिला खुणा करीत होता.

त्यांनीं शंभूला उलट धोंडे मारण्याचा उद्योग आरंभिला. परंतु तो चपळ आणि जिवावर उदार झालेला पोर, ते चुकवून त्यांस उलट एक एक चांगला पोफळा एवढाला धोंडा कसा टिपून मारात होता. दोघांस तर त्याचे धोंडे असे जिव्हारीं लागले कीं, ते मटकन् खालीं बसले. त्यानें फिरून शेरखानास त्याच्या अगदीं गुह्य-स्थानावर लागावा ह्मणून एक नेमका धोंडा मारला होता, परंतु ऐन वेळेला त्याचें तिकडे लक्ष जाऊन त्यानें उडी मारली, ह्मणून तो त्या ठिकाणीं न लागतां त्याच्या उजव्या गालफडावर अशा जोरानें बसला कीं, स्वारी तिरमिरी येऊन पडण्याच्याच बेतांत आली. तथापि, रमेच्या लालसेनें केवळ वेडावलेला तो नोडगा त्या मारास न जुमानतां तसाच तिच्यामागें लागला. तों दुसरा एक धोंडा त्याच्या अगदीं नेमकाच डगीवर बसून तींतून रक्तच वाहूं लागलें. तेवढी रमेस शंभूकडे यावयास सवड सांपडली, पण हें खानपंचक या पोरांची ही बहाद्दरी पाहून असें खवळलें होतें, कीं कांहीं विचारूं नका. त्यांनीं सपासप आपलीं हत्यारें बाहेर काढिलीं, आणि ते त्या मुलांमागें धांवूं लागले. ही ससेहोलपट इतकी निकरानें चालली कीं, डोळ्यांचें पातें लवतें न लवतें तों ही सर्व मंडळी दृष्टीच्या टप्याबाहेर गेली.

रमेसारख्या बारा वर्षांच्या अल्लड, सुकुमार, गरीब, व निरपराधी गाईवर आणि शंभूसारख्या दीन, अनाथ, भागिनीवत्सल, तरुण, व केवळ मजेनें खेळण्यावागण्याचें ज्याचें वय, अशा तिच्या त्या भावावर वरीलसारखा प्रसंग कां बरें यावा? आणि तो तरी कोठें आणि केव्हां?

आपल्या कुलस्वामीच्या दर्शनास जाण्याच्या वाटेंत-हम रस्त्यावर-चांगलें फटफटीत उजाडून सहस्त्रकराचा अंमल चहूंकडे प्रकाशमान असा दिसत असतां !

उत्तर एकच. राष्ट्राची परतंत्रता, विदेशी—विधर्मी—लोकांचा अंमल, आमच्या लोकांतील कर्तृत्वाचा अभाव, पुढारी ह्मणविणारांचें सुलतानापुढें कुत्र्यासारखें लांगूलचालनाचें भित्रें व्रत, गरीबी. भाषा मात्र भिन्न, बाकी सर्वांचा अर्थ मुळांत गेलें तर एकच. त्याचप्रमाणें अशा प्रसंगीं आमचे सद्गुणही आह्मांला त्रास देतात. आतां पहा, केवळ बारा वर्षांची गरीब अनाथ मुलगी. काय झालें होतें, गेली असती ती त्या शेरखानबरोबर तर? पण जन्माबरोबरच ह्मणजे गर्भांतच आमच्या स्त्रियांच्या ठिकाणीं रुजून त्यांच्याबरोबर सारखी वाढत गेलेली त्यांची पातिव्रत्याची चाल, जातिशुद्धत्वाची कल्पना, संकराचा कंटाळा, शीलापुढें धनदौलतीची यत्किंचितही मातब्बरी न वाटणें, आणि वाटणें ह्मणजे नरकांत जाण्यासारखें समजणें, इत्यादि गोष्टी पुरुषांत जरी कधीकधीं कमी प्रमाणांत आढळतात, तरी आमच्या स्त्रियांत त्या अगदीं इतक्या भरपूर वसत असतात कीं, त्यांतील कोणतीही एक गोष्ट सोडून दुसऱ्या हजार सुखांचा लाभ जरी होणार असेल, तरी तीं हजार सुखें झुगारून देऊन, त्या आपलें शील कायम ठेवण्याकरितां प्राणही द्यावयास मागेंपुढें पाहावयाच्या नाहींत. वरील मासला त्यांतलाच आहे. तिचा भाऊही अजून वयानें लहान असल्यामुळें तिच्याप्रमाणेंच शुद्ध संस्कारांत होता, आणि ह्मणून त्यालाही आपले नैसर्गिक सद्गुण टाकून कामचलाऊ आणि सुखकर वाटणारें लांगूलचालन अजून विकार

करूं शकलें नव्हतें. कारण पुरुष तरी वरील नैसर्गिक सद्गुणास जी कधींकधीं रजा देतात, आणि लोकधाराजिणे-पणा, धर्माधर्माबद्दलचा ढिलेपणा, सत्ताधाऱ्यांची हांजी-हांजी इत्यादि जे अनेक तात्कालिक आणि व्यक्तीपुरते सुखपरिणामी दुर्गुण उचलतात, ते लहान वयांत न उच-लतां, उशिरां येणारे आणि लवकर जाणारे केवळ शाळू-सोबती असे जे दाढीमिशांचे केंस, ते त्यांना येऊं लागले ह्मणजे. शिंगें फुटूं लागलीं ह्मणजे. तोंपर्यंत शुद्ध स्वाभिमान, कुलाभिमान, धर्मश्रद्धा, विटाळपाटाळ वगैरे सर्व आपले-पणाचीं लक्षणें त्यांच्या ठिकाणीं चांगलीं जिवंत असतात आणि याचें मुख्य कारण घरांतील बायकांचें शुद्धाचरण व त्यांच्याकरितां त्यांच्या नवऱ्यांचेंही जुन्या पद्धतीचें स्वधर्मपालन. त्यामुळें षोडशीच्या आंतील वयांत मुलांस मिळणारें प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष असें दोन्ही प्रकारचें शिक्षण साधारणतः एकाच जुन्या—ह्मणजे आपलेपणा कायम राख-ण्याकडे जिचा कल आहे अशा—प्रतीचेंच मिळत असतें. शिवाय स्वतःची स्वतंत्र अक्कल त्यांस फुटलेली नसते, त्यामुळें तो शुद्ध राहतो. असो. आपल्या या वेदांत-विचारांत तिकडे बिचाऱ्या त्या रमेचें आणि त्या शंभूचें काय होईल? आपला होईल वेदांत, परंतु त्यांचा तिकडे होईल जीवान्त.

हं, ही कोणाची बरें 'देवारे देवा' ह्मणून केंविलवाणी वाणी? 'भाऊ! भाऊ!' फिरून तसाच, अगदीं तोच आवाज ऐकूं येतो. हो, ही रमेचीच वाणी. 'ताई मरावयाचें हें आहेच आहे. मारून मरावें' हे शब्द शंभूचे, खात्रीनें त्याचेच. काय? अजून त्या पोरांनीं दाद दिली नाहीं अं त्या

शिखानष्टांस! भलेबहाद्दर! शाबास! असाच आणखी थोडा वेळ धीर धरा अं. ते बघा कांहीं लोक तिकडून येताहेत. ते चांगले धष्टपुष्ट आहेत. बाकी आतां तुमचा फार वेळ टिकाव लागणार नाहीं. त्यांनीं चहूंकडून तुमचा रस्ता कसा अगदीं घेरला आहे. संकट फार मोठें आहे. तुमचे जीव ते किती? पण काय करणार? विषम काल आला ह्मणजे असाच चहूंकडून येतो. तथापि स्वशीलास घट्ट धरून वागणारांना, ईश्वर, ते त्याच्या कसोटीस उतरले तर कोणत्या नाहीं कोणत्या तरी रीतीनें साहाय्य करतोच. 'परित्राणाय साधूनाम्' असें त्याचें वचन आहे, तो तें कधींही विसरणार नाहीं.हे पहा ते लोक बरेच जवळजवळ येत चालले. ते आतां चांगले दिसताहेत. हो, त्यांपैकीं जो पुढें आहे, तो फारच मजबूत दिसतो. खरोखरच तो तुह्मांला सोडवील. 'देवा, कितीरे अंत पाहशील. सोडीव, सोडीव, आतां या वाघाच्या हातून या हरिणीला. धांव धांव देवा! आई जगदंबे! धांव, अनाथाची माउली! दीनाची साउली! आई माते! नाहीं आतां दम निघत मला. भाऊ, मी या धोंडयावर टाळकें आपटून एकदांची होतें मोकळी आतां. आतां नाहींरे माझ्यानें एकही पाऊल टाकवत पुढें.' असे रमेचे उद्गार ऐकून शंभू तिला ह्मणतो 'ताई, हें बघ इतका दम काढलास तसा आणखी एक अर्धीपाव घटका दम काढ. कोणीना कोणी तरी चार मराठे गडी आतां आपल्याला खात्रीनें भेटतील. ते बघ त्या उंचवटयाच्या पुढून कांहीं गडी येत आहेत.' याप्रमाणें तो तिला धीर देत आहे. ती फिरून 'आई, धरणीमाते, तूं तरी आतां दुभंग हो, नि या

गरीब गाईला आपल्या पोटांत घे. भाऊ, देवाला जात होतों आपण 'नि देवानें बघ हें कसें संकट आपल्यावर आणलें! तेव्हां आपण त्याचें दर्शन घ्यावें असें त्याच्या मनांतच नाहीं.' 'असें नको ह्मणूं ताई. हा बघ, हा धोंडा भिरकावतों बघ. (धोंडा गुं गुं करीत जातो.) हा लागला पहा. झालाच चीत ह्मणून समज तो लांडा. चल पळ लवकर.' (धोंडा चुकून खान खवळलेल्या लांडग्याप्रमाणें रमेवर झेंप टाकतो.) 'हं खबरदार, लांडग्या पुढें आलास तर.' असें ह्मणत शंभूही त्याच्या अंगावर दोन्ही हातांत दोन धोंडे घेऊन धांवला आणि धांवतां धांवतां 'कोण मराठयाच्या पोटचा खरा मर्द गडी जर असेल तर त्यानें या वेळीं धांवावें, लवकर धांवा. नाहीं तर हा लांडा माझ्या बहिणीस धरतोहो.' अशी एक त्यानें मोठयानें आरोळी मारली. 'भिऊं—नको आलों' ह्मणून या वेळीं मात्र त्याच्या आरोळीला उलट जबाब आला. ज्या पाखराला पकडण्यास इतका वेळ धडपडलों तें गुलजार पाखरूं आतां लगट नाहीं केली तर हातचें जाणार, असें मनांत जाणून, शेरखाननें पोरावर तरवार उपसली आणि त्याला एक आपल्याकडून असा फटका दिला कीं, त्यानें जर त्या वेळला चपळाई केली नसती अथवा त्याच्याकडून तशी चपलाई झाली नसती तर खचित त्याचें शीर एकीकडे आणि धड एकीकडे, असा प्रकार झाला असता. बाकी झालेली किंवा केलेली चपळाई त्याला सर्वस्वी तर बचवूं शकलीच नाहीं; त्याच्या कानावर तो लागून अर्धा अधिक कान पार गेला आणि त्याच्या गालासही त्या तरवारीनें चांगलेंच चाटलें. यामुळें तिरमिरी

येऊन तो खालीं जमीनीवर पडल , आणि रमेनें 'भाऊ, शेवटीं गेलासना मला टाकून!' ह्मणून मोठ्यानें आक्रोश करीत 'ही पहा, मीही आल्येंच तुझ्या मागोमाग' ह्मणून जमीनीवर धाडकन आंग टाकून दिलें. त्यासरशीं तें लांडे-पंचक एका ठिकाणीं गोळा झालें आणि तिला उचलण्याची तयारी जो तो करूं लागला, परंतु आपसांतच चुरस उत्पन्न होऊन जें काम लगेच व्हावयाला पाहिजे होतें तें तितकें लवकर न होतां दिरंगाई झाली. शेवटीं शेरखाननें रमेला उचलली. ती उचलतां क्षणींच शुद्धीवर येऊन मोठ्यानें ओरडली 'मेल्या मांगा, कुठें नेतोस मला ?' तों मघाची आरोळी पोंचून आलों ह्मणून प्रत्युत्तर दिलेला गृहस्थ धापा टाकीत तेथें येऊन ठेपला. त्यानें दम न खातां लगेच त्या शेरखानास त्याच्या सोबत्यासह तोंडानेंच अशी तंबी दिली कीं, ते पाऊल पुढें टाकण्यास जरासे कचरलेच. तथापि 'अबे जाबे. ऐसे छपन्न देखे है हमनें तुमारे सरिखे. जो तुमकू करने होयसे कर लेव. हमारी काबूसेकी छोकरी, आज महिना हुवा. हमने बटलाईसो अब दुसरेके साथ भाग चली. तो हम उस्कू ले जाते है. इसमे हम कुच चोरी नहीं करते.' रमा त्याच्या खांद्यावरूनच 'नाहीं हो नाहीं, हा खोटें बोलतो' असें ह्मणूं लागली. तों तिचें तोंड दाबण्याचा दुसऱ्या एकानें इलाज चालविला. तें पहातांच या नव्या आलेल्या मर्दानें त्या तोंड दाबणाऱ्या इसमाच्या छातींत अशी एक जोरानें लाथ दिली कीं 'या अल्ला तोबा तोबा परवरदिगार ! खून खून ' ह्मणून ओरडत आणि विव्हळतच तो खालीं पडला. इतकें होत आहे तोंच शेरखांनीं रमेला खालीं उतरून

आपली तरवार उपसली आणि त्याबरोबरच बाकीच्यांनींही आपापल्या तरवारी उपसून चौघेही या नव्या गृहस्थाच्या अंगावर तुटून पडले.

ह्या नव्या गृहस्थाजवळ त्याची तरवार नव्हती. परंतु एक भरींव चिवट कळकाची चांगली कणखर काठी होती, ती तो पट्याप्रमाणें गरगर फिरवूं लागला, आणि ते चौघे व हा एकटा होता तरी त्यांस यानें दाद दिली नाहीं. बराच हा कळकी काठीचा आणि तरवारीचा सामना चालला होता: कोणीच दमेना. सुदर्शन चक्राप्रमाणें जणूं स्वयंप्राप्त वेगानें या नव्या मराठ्या मर्दाची काठी त्याच्या भोंवती फिरत होती, आणि कसेंही करून त्याला एखादा तरी वार वर्मी लागेल ह्मणून आपल्याकडून होती नव्हती तेवढी खटपट लांडेभाईची चालली होती. पण व्यर्थ. शस्त्र स्वत: थोडेंच कांहीं काम करीत असतें. शस्त्र ज्या हातांत असतें त्याच्या कर्तृत्वावर त्याचा पराक्रम अवलंबून असतो. शेवटीं अगदीं सगठ होऊन काम निकरावर आलें. घे घे ह्मणून ते चौघेही ह्या एकट्या मर्दावर वार करूं लागले. पण ते सर्व मोठ्या शिताफीनें चुकवून संधी साधून त्यानें त्यांपैकीं एकाच्या मनगटावर आपल्या काठीचा असा नेमका रट्टा दिला कीं, त्याच्या हातांतील तरवार गळून पडली आणि हायहाय करीत तो गृहस्थ कोलमडत लांब गेला. या मर्दानें ती त्याची पडलेली तरवार लगेच उचलली आणि त्याचक्षणीं दुसऱ्या एकासही असा वार केला कीं, तोही 'या अल्ला! मर गया! तोबा!' ह्मणत जमीनीवर पडला. मग उरले त्यांची काय धांदल विचारतां? त्यांनीं पोबारा करण्याचा विचार करून आपला रस्ता

सुधारला. इतक्यांत या मर्दाच्या टोळींतील इतर मंडळीही अगदीं जवळ येऊन ठेपली आणि कांहीं तरी भयंकर प्रकार आहे अशी त्यांची अगोदर खात्री झाली होती, आणि ते साशंक असेच जरा जलद्जलदच या गड्याकडे येत होते. तोंच 'मर्दहो, पाहतां काय? पकडा, जाऊं देऊं नका, त्या चोरांना. संभाळा, पण त्यांच्या हातांत तरवारी आहेत.' अशा प्रकारची या मर्दाची त्यांना इशारत मिळाली. आणि ते सर्व गडी—१५।२० असामी होते ते—त्या पळून जाणाऱ्या लांडेखांस चहूंकडून फांसेपारध्याप्रमाणें अडवून उभे राहिले, आणि प्रत्येकानें आपलें दंडुके सावरले. शिवाय त्यांपैकीं एकदोघांजवळ पट्टेही होते ते तर त्या पळून जाणाऱ्या मुसलमानांच्या अंगावर स्वतः होऊन चालूनही गेले. हें उग्र स्वरूप पाहतांच आतां आपली खास शंभर वर्षे भरलीं असें समजून ते मुसलमान अगदीं लाचार झाले आणि पळून जाण्याचा नाद सोडून देऊन त्यांनीं फिरून आपल्या तरवारी म्यानांत घातल्या आणि ज्या मर्द गड्यानें त्यांस पळावयास लाविलें त्याच्याकडेच फिरून ते वळले. इकडे या मर्दानें प्रथम रमेला जवळ घेऊन ती जी भयानें कांपत होती व स्फुंदून स्फुंदून रडत होती तिला कुरवाळून धीर दिला आणि तिच्या भावाची वाट काय झाली आहे ती पहावी ह्मणून तो त्याच्याकडे वळला. तों तो मुलगा शुद्धीवर येऊन डोळे उघडून आपले शत्रू चीत झाले असें पाहून जरा हुशार झालेला असा उठण्याचा प्रयत्न करीत होता. परंतु रक्तस्राव बराच झाला असल्यानें आणि त्याच्या जिवाअजोग त्यानें श्रम केले असल्यानें त्याच्यांत अवसान

राहिलें नव्हतें. त्यामुळें त्याला उठतां येईना. तथापि मोठ्या कष्टानें तो तसाच उठून आपल्या बहिणीस लांड्यांच्या हातून सोडविणाराच्या पायांवर मस्तक ठेवण्याकरितां या मर्दाकडे हळूहळू येऊं लागला. रमेला आपला भाऊ चालतानां पाहून जो पराकाष्ठेचा आनंद झाला तो कांहीं पुसून सोय नाहीं. ती धांवत त्याच्याकडे गेली आणि तिनें त्याच्या गळ्यास एकदम मिठी मारली. ही प्रेमातिशयाची भेट सहन करण्यास त्याला शक्ती उरली नव्हती, यामुळें तो मटकन् खालीं बसला. इतक्या अवकाशांत या मर्दाच्या इशारतीवरून त्याच्या इतर गड्यांनीं त्या मुसलमानांस एका ठिकाणीं घोळक्यांत वेढून घेतलें आणि शस्त्रें टाकून द्या ह्मणून त्यांनीं त्यांस हुकूम केला. ते चौघही इसम, त्यांच्यापैकीं एक असामी जेथें घायाळ होऊन पडला होता, त्याच्याजवळ बसले आणि त्याला कितपत जखमा झाल्या आहेत हे पाहूं लागले. त्यांनीं शस्त्रें खालीं ठेवल्यावर निर्धास्त झालेले नवे मराठे गडीही हें काय खटलें आहे एकंदर तें कळावें, ह्मणून उत्सुक होऊन त्यांपैकीं एक-दोन इसम त्या लांड्यांसच विचारूं लागले, परंतु इतकी फजिती झाली होती तरी ते लांडे त्यांना कांहीं तरी बनावट गोष्ट सांगूं लागले. इकडे तो मुलगा आपल्या बहिणीस सोडविणाराच्या जवळ येऊन ‘ महाराज आपले आमच्यावर थोर उपकार झाले ’ असें ह्मणून जमीनीकडे पाहत उभा राहिला. त्याच्यानें जास्त कांहीं बोलवेना. मनांत तो ईश्वराचे आभार मानीत होता आणि आज त्या दयाघनानेंच या मनुष्यास आपल्या बचावाकरितां इकडे पाठविलें, नाहीं तर आपली बहीण खास बाटली असती व आपणही

गार झालों असतों, असें त्याच्या अंतःकरणांत सारखें वागत होतें. रमाही प्रथमचा आनंदाचा आणि आश्चर्याचा झटका नाहींसा होऊन आतां ईश्वराचे आभार मानीत आणि या मर्दाकडे स्त्रीजातीच्या स्वाभाविक लज्जेनें युक्त अशा मुद्रेनें पाहत उभी राहिली. या तरुणास पाहून तिच्या मनांत अनेक मुग्ध विचारतरंग येऊं लागले. तिला आपणांस काय वाटत आहे याचा पुरता पत्ताच लागेना. तथापि आपल्यास सर्वस्वी काळाच्या दाढेंतून वांचविणारा हा कोण? आपण याचें उतराई कसें व्हावें? आपण काय केलें ह्मणजे तें ईश्वराला आवडेल, या विचारांनीं ती अगदीं गुंग झाली होती. त्या मर्द गड्यालाही आपल्याला मिळालेल्या विजयाबद्दल वगैरे जी फुशारकी वाटावयाची ती, त्याचप्रमाणें ईश्वरानें आपल्यास यश दिलें, ह्मणून त्याचे आभार वगैरे मानावयाचे ते इत्यादि सर्व विचार त्याच्या मनांत एका क्षणांत आले आणि गेले. परंतु आपण कांहीं तरी अलौकिक पहातों आहों, हा देखावा एकंदर फारच विलक्षण आहे, आपल्या पुढें उभी असलेली ही मुलगी कोण आहे? तिला आपण काय विचारावें? तिच्याशीं कसें बोलावें? वगैरे प्रकारें पूर्वी न अनुभवलेले विकार त्याच्या मनांत येऊं लागले, आणि तो क्षणभर अगदीं गोंधळल्यासारखा झाला. त्याला स्वतःस मिळालेल्या या जयाबद्दल आनंद आणि अभिमान वाटण्यास चांगली जागा असूनही त्याला तसा आनंद आणि अभिमान झाला आहे, असें कांहीं पाहणारांस वाटलें नसतें. भीति वाटण्याचें वास्तविक कारण कांहीं नव्हतें. तथापि ती त्याच्या मनांत अगदींच नव्हती असेंही ह्मणतां येत नव्हतें. कारण बाबरल्यासारखी त्याची मुद्रा स्पष्ट

दिसत होती. त्याच्या या वेळच्या चेहऱ्यावर आश्चर्याचीही छटा थोडी होतीच. एकंदरींत आनंद, भीति, आणि आश्चर्य आणखीही अनेक यांशीं सजातीय आणि त्याचप्रमाणें विजातीय मनोविकारांचा या प्रसंगीं त्याच्या ठिकाणीं संकर झाला होता. अनेक विचारतरंग त्याच्या मनांत सारखे येत होते आणि क्षणांत जातही होते. अशी ही एखाद्या भांग प्यालेल्या मनुष्याप्रमाणें झालेली त्याची स्थिति, खरोखरच पाहणारालाही बुचकळ्यांत पाडीत असे. याची मुद्रा आणि विसंगत हालचाली पाहून त्या मुलीची, तिच्या भावाची आणि त्याच्या इतर सोबत्यांचीही थोडी फार अशीच चमत्कारिक स्थिति झाली. ती मुलगी तर विशेषच बावरली, आणि शेवटीं खालीं मान घालून वांकड्या नजरेनें साशंकपणानें मधूनमधून मात्र त्याच्याकडे पाहत अशी ती उभी राहिली. अखेर या मर्दानें आपल्या सर्व मनोविकारांस रजा दिली, आणि त्या मुलाकडे तो फारच निरखून पाहूं लागला. तों त्याच्या असें नजरेस आलें कीं, त्या मुलला दोन जबर जखमा झाल्या आहेत आणि त्यांतून बराच रक्तस्राव होऊन वाऱ्यानें आतां त्या जखमांच्या भोंवतालचा भाग सुजत चालला आहे. अशी त्या मुलाची स्थिति त्याच्या लक्षांत येतांच त्यानें लगेच त्याच्या जखमा बांधण्याची तजवीज करण्याचें मनांत आणिलें आणि आपल्या सोबत्यांपैकीं एकास हाक मारून त्याला तो त्याबद्दल विचारूं लागला. तो गृहस्थ बराच प्रौढ किंबहुना उतार वयाचा असल्यानें त्याला त्या कामांत चांगलीच माहिती होता. त्यानें लगेच त्याच्या जखमा बांधल्या आणि मग त्या मुलाला त्याची सर्व हकीकत ते दोघेही विचारूं लागले

आपल्या भावाच्या जखमा बांधतांनां रमा लज्जा बाजूस ठेवून त्याच्या अगदीं जवळ येऊन उभी राहिली होती. तीं दोघेंही बहीणभावंडें एकमेकांकडे पाहून आनंद मानूं लागलीं; त्याचप्रमाणें शब्दांनीं नाहीं तरी नुसत्या नजरेनें तीं सारखीं एकमेकांशीं बोलत होतीं असें दिसत होतें. असो, हा भाग बराच लांबला; तेव्हां येथेंच पुरा करून पुढील भागांत या नव्या गृहस्थाची आणि वाचकांची ओळख घालून देऊं.

## प्रकरण ८ वें.

प्रहरावर दिवस आला होता. ऊन बरेंच तापूं लागलें होतें. ह्मटलें ह्मणजे पायीं प्रवास करणारांची मुक्कामाचीच वेळ झाली होती. आमच्या शंभूला फारच तहान लागली होती. भूकही नव्हती लागली असें नाहीं. तथापि ती तहानेंत सध्यां अगदीं एकजीव होऊन गेली होती. त्याला आपल्या बहिणीच्या संरक्षणासाठीं करावे लागलेले त्याच्या वयाअजोग श्रमसायास, आणि या असल्या पोरवयांत त्यांच्या कोंवळ्या पायांस पडलेली आदले दिवसापासूनची सारखी आठदहा कोसांची मजल, हीं सर्व लक्षांत आलीं ह्मणजे, त्यानें अजून दम धरला होता हेंच मोठें आश्चर्य करण्यासारखें होय. त्याच्याहीपेक्षां रमेची तर विशेषच तारीफ होय. केवळ १२ वर्षांची अल्लड सुकुमार पोर ती; पारिजातकाच्या कळीप्रमाणें केव्हांच कोमेजून जावयाची. सारांश काय कीं, या वेळेस रमा व शंभू या दोघांही बहीणभावांची तहान, भूक व शीण हीं सर्व एक होऊन

त्यांच्यानें आतां पुढें मैल अर्धमैलाचीही मजल होणें संभवनीय नव्हतें. त्या दोघांचेही ग्लानीमुळें डोळे मिटत होते. पाय पेंगाकडून झोंके जात होते. परंतु अपरिचित व अत्यंत उपकारी अशा स्वतःपेक्षां वडील मंडळीशीं प्रसंग पडल्यामुळें भिडेनें व ओशाळगतीनें त्या दोघांही मुलांची बोलतां येत असून मुक्या जनावरां-प्रमाणें स्थिति झाली होती. असो ! मुक्यांचा व जाणत्यांचा ईश्वरानें पाठविलेला वाली मागील भागांतील जवानमर्द त्या गोजिरवाण्या कोंवळ्या मुलांची ही स्थिति पाहून मनांत फारच कळवळला. त्यानें लगेच मुक्कामाची तजवीज करण्याकरितां आपल्या सोबत्यांपैकीं एक-दोघांस कांहीं कानमंत्र सांगून लावून दिलें, आणि आपण सर्व मंडळीसह जवळच एका मोठया चिंचेच्या झाडाखालीं तळ दिला. मालोजी ( कारण, मागील भागांतील जो जवानमर्द तो हाच होय, ) त्या दोघांही मुलांजवळ बसला आणि त्यांस चार समाधानाच्या गोष्टी सांगूं लागला. त्यानें त्या दोघांच्याही पाठीवरून हात फिरवून त्यांस कुरवाळलें, व ‘ लवकरच तुमच्या न्याहारीची व्यवस्था होईल ’ ह्मणून मोठ्या गोड शब्दांनीं त्यांस आश्वासन दिलें. मालोजीचा भाऊ विठूजीही बरोबर होताच. त्यालाही या दोन मुलांची फार कींव आली.

मालोजीच्या सांगण्याप्रमाणें लवकरच त्याच्या सोब-त्यांनीं जवळच एका हाकेवर असलेल्या लहानशा वाडींतून कांहीं भुईमुगाच्या शेंगा, थोडा गूळ, शेर दीडशेर दूध, कांहीं केळीं व उत्तम स्वच्छ विहिरीच्या पाण्यानें भरलेलें एक भांडें असें सामान आणलें. हें सामान येतांच प्रथम

त्या मुलांस त्यांची तहानभूक भागण्यापुरतें त्यांतील खाऊंपिऊं घालून नंतर मालोजीनें व त्याच्या सोबत्यांनीं उरलेल्या जिनसांवर आपली न्याहारी आटोपली. याप्रमाणें फिरून ताज्या दमानें त्या मंडळीनें तेथून आपला मुक्काम हालविला व दुपारच्या जेवणाची तजवीज पाहण्याकरितां तें सर्व मंडळ जवळच चिंचेच्या व आंब्याच्या गर्द झाडींत दिसत असलेल्या एका छोट्या वाडीकडे वळलें. मालोजीच्या प्रेमळ व गोड भाषणांनीं आणि कळकळीच्या वागणुकीनें शंभू व रमा हीं दोघेंही त्याच्याशीं आपल्या पोरस्वभावाला अनुसरून अगदीं अत्यंत परिचिताप्रमाणें मन मोकळें करून बोलूंचालूं लागलीं. मालोजीही मोठ्या कौतुकानें व अति आनंदानें त्यांच्याशीं संभाषण करूं लागला.

**मालोजी**—शंभूराव ! खरेंच पण तुह्मी या रमेला घेऊन असे एकटे इतक्या लांबच्या प्रवासाला निघालां तरी कसे ? रमाबाई, तुह्मीं तरी भावाचा बेत कसा पसंत केला ?

**शंभू**—काय करावें असें न करावें तर ? त्या नोड्यांच्या कचाट्यांतून सुटण्यास दुसरा कांहीं रस्ताच दिसेना.

**रमा**—मला किनई त्या भयाण घरांत मुळींच कसें तें चैन पडेना.

**शंभू**—आणखी मलाही आईबापावांचून तें घर कसें मसणवट्यासारखें दिसूं लागलें.

**रमा**—नि घरांत किनई त्या मेल्यांनीं कांहीं सुद्धां ठेवलें नाहीं हो. चटसारें धुवून नेलें अगदीं. ( गाडीवरून येते. )

**शंभू**—इतकेंही होतें तरी राहिलों असतों तिथंच, पण ताईचें सारखें माझ्यामागें टुमणें लागलें अगदीं कीं, भाऊ आपण किनई कुठें तरी लांब जाऊं ह्मणून.

**मालो**०—( रमा खालीं मान घालते, तिजकडे पाहून मालोजी हंसतहंसत पण जरा हलकेंच तिलाच उद्देशून. ) कां रमाबाई, ऐकूण ही सर्व आपली उचल येवढी होयना पण.

**रमा**—मला बाई तें कांहीं सांगतां येत नाहीं काय त्या वेळेला मला जें वाटलें तें. त्या गांवाचें फिरून दर्शनसुद्धां नको असें वाटूं लागलें.

**शंभू**—आणखी बाबा कधींकधीं ह्मणत असत कीं, 'स्वदेशीं चोरी व परदेशीं भिक्षा' तें त्यांचें ह्मणणें मला वरचेवर आठवूं लागलें. ह्मणून मी कांकूं न करितां ताईला घेऊन निघालों.

**मालो**०—अरेरे! ईश्वरा! असा दुर्धर प्रसंग या असल्या लहान मुलांवर आणण्यांत तुला काय थोरवी वाटली बरें? ( त्या मुलांस. ) सगळें खरें. पण तुमचे आईबाप इतक्या त्रासांत हा अगदीं निर्वाणीचा प्रसंग गुजरेपर्यंत कशाला राहिले कोण जाणे? त्यांनीं आपलीं हीं दोन्हीं बचडीं घ्यावयाचीं आणि वेळींच कोठें तरी त्यांच्या दृष्टीआड व्हावयाचें.

**शंभू**—बाबांचा होता हो तसाच विचार, पण आमची आई दुखण्यानें पडल्यामुळें त्यांचें कांहीं एक चालेना. आई जरा कुठें हिंडूंफिरूं लागते न लागते तोंच त्या चांडाळांनीं हा डाव साधला.

यांचे हें असें बोलणें चाललें आहे तोंच त्यांत मध्यें एक व्यत्यय आला. त्यामुळें हीं मुलें कोणाचीं कोण वगैरे

खुलासा होणें तसेंच राहिलें. कर्मधर्मसंयोग असा आला कीं, नाईक निंबाळकरांचा त्या दिवशींचा मुक्काम याच वाडी-वर व्हावयाचा होता. मागें सांगितलेंच आहे कीं निंबाळ-करांचा या सालीं सर्व इतमामासह मोठ्या थाटानें या जत्रेस येण्याचा संकल्प झाला होता. त्याप्रमाणें त्यांच्या बरोबर टकरीचे रेडे, एडके वगैरे जे होते, ते आघाडीला असल्यामुळें, या शिकारखान्यावरील माणसें, मालोजी वगै-रेंच्या अगदीं जवळ येऊन पोंचलीं होतीं. इतक्यांत उन्हाच्या तापानें गरम होऊन गवळ्याच्या हातांतून रेडा सुटला; आणि चौखूर इतस्ततः बागडूं लागला. गवळी त्याच्या मागोमाग धांवत होता व थोड्याच अंतरावरून येत असणाऱ्या तालीमखान्यांतील कांहीं पैलवानगडयांना त्यांनीं विरुद्ध दिशेनें लगट करून रेड्याला समोरून आडवावें ह्मणून मोठमोठ्यानें ओरडून सांगत होता. 'ओ—बाळ्याबा, अस फुढें व्हा फुढें. हं बघता काजी रामजी त्या—त्या बाजुन मारा धांव अस मेंग्यावाणी का करता व्ह ? यो गेन्या, अर नाग्या, कार अक्षि भगूबाईवाणी दूर दूरच उभ ? अतां दावा कीं का असल ल्योकानों तुमची पइलनवानगिरी ती ! व्हा, फुढें व्हा, मर्दानों !' अशा प्रकारें मधून-मधून आरोळ्या ठोकतो आहे, फिरून धांवतो आहे; आपल्याशींच 'उगाच खा खाऊन बुडवल ल्योकांनीं न् काय् ?'' असें पुटपुटतो आहे; तिकडे त्या तालीमबाजांपैकींही कांहीं आडवेतिडवे धांवून त्या बिचकलेल्या जनावरास आडवा-यला पाहताहेत; तेही तोंडास येईल तें मधून मधून ओर-डत आहेत, असा सारा एकच गोंधळ उडून गेला होता. हल्याजी तर बोलून चालून हल्याजीच ! त्यांत टक-

रीचे. डोक्यावर टांगलेला कडबा खाणारे. डोळे लाल झालेले, धुंद आणि बिचकलेले. मग काय विचारतां ? जों जों ही मंडळी त्याला घेरण्याचा यत्न करीत तों तों तें वेडें आणि मस्त जनावर जास्त बिचके, आणि विशेष जोरानें धांवे.

ही आरडाओरड आणि गर्जना ऐकतांच मालोजीचें व त्याच्या बरोबरच्या मंडळीचेंही तिकडे सहजच लक्ष गेलें. मालोजी हा काय प्रकार आहे ह्मणून कांहीं वेळ स्तब्ध पाहत उभा राहिला, तेव्हां त्याच्या लक्षांत सर्व आलें. त्याला या धांदलींत शंभू व रमा येथें उपयोगी नाहींत असें वाटून त्यानें त्यांची समजूत करून एका सोबत्याबरोबर त्यांस पुढें लावून दिलें. मुलें जाण्यास खुषी नव्हतीं, परंतु मालोजीचा त्यांच्यावर हा आपणास जीवदान देणारा उपकारकर्ता या नात्यानें चांगलाच वचक बसला होता, त्यामुळें तीं निमूटपणें धर्माजीबरोबर चालतीं झालीं. तों इतक्यांत तें सर्व कडचाळ मालोजीच्या अगदीं जवळ येऊन ठेपलें. रेडा धरण्यास धडपडत असणारे नाइकांकडील गडी अगदीं मट्टयास आले होते. त्यांची तें जनावर हातीं लागण्याबद्दल अगदीं निराशा झाली होती. रेडा पायांनीं माती उकरीत होता. मध्येंच कोणी फारसें जवळ नसलें ह्मणजे शिंगानींही मातीचे लहानलहान वारुळवजा असणारे उंचवटेच्या उंचवटे पार एका घसक्यासरसे वर उडवून देत होता. कोणी माणूस जवळ आलें कीं क्वचित पळे, किंवा बऱ्याच वेळां त्यावरच हुंदडी मारण्यास धांवे. एकदोन इसम तर या दंगलीमधून केवळ त्यांच्या बायकांचें कुंकू बळकट ह्मणूनच वांचले. आमच्या पाटिलबुवांनीं आपल्या दोघांतिघां शेलक्या इसमांस कमरा कस-

ण्यास सांगितलें. या प्रसंगीं मालोजीनें न सांगतांच विठू-जीनेंही कमर कसून अगदीं खूप अवसान धरून मोठी ऐट केली. त्याला या वेळीं जरा चुरस वाटूं लागली होती. तो मनांत ह्मणाला, कीं घरीं गेल्यावर दादाची बहाद्दरी मात्र सर्व जण आईला सांगतील, आणि पुंडेकाकांसही ह्या सर्व गोष्टी कळतील, व मग आई, पुंडेकाका वगैरे सर्व मंडळी दादाची पाठ थोपटून त्याची वाहवा करतील, आणि आप-ल्याला खालीं मान घालून फुकट हिणवून घेण्याचा मात्र प्रसंग येईल. हा विचार त्याच्या मनाला बराच जाचूं लागला होता. ह्मणून मोठें धैर्य बांधून त्यानें या वेळेस वरीलप्रमाणें आपणही कांहीं मर्दुमकी गाजविण्याचा वि-चार कायम केला होता. विठोबाची ही कडेकोट तयारी व तें पवित्र्यांत उभें राहणें पाहून मालोजीला फारच कौतुक वाटलें. त्यानें त्याला शाबासकी दिली, आणि सांगितलें कीं ‘ मी आहें तोंपर्यंत तूं स्वस्थ ऐस. नुसती दुरून मौज पहा. उगाच धाडस करूं नकोस. अजून लहान आहेस तूं, ” वगैरे वगैरे. परंतु तो कांहीं केल्या ऐकेना. तेव्हां मालोजीला मोठीच काळजी पडली. तथापि त्यानें त्याचा हुरूप अगदींच नाहींसा करून त्याचा हिरमोड करणें चांगलें नाहीं असा विचार केला, व त्याला संभाळूनही आपल्याला हल्या पकडतां येतो कीं नाहीं हें तरी पाहूं, अशी हिंमत बांधून मालोजी आपल्या सोबत्यांसह त्या रेड्यास अडविण्याच्या तयारीस लागला. आपण, विठूजी व आणखी एक गडी असे त्याच्या समोरच्या बाजूनें पुढें होऊन, दुसऱ्या दोघांस त्याच्या डाव्या व उजव्या आंगास होण्यास त्यानें सांगितलें. चौथ्या बाजूनें ह्मणजे पाठीमागें

पहिला गवळी व त्याचे साथीदार वगैरे मंडळी होतीच. याप्रमाणें तयारी करून एका घटकेच्या आंत चारी बाजूनें त्या हल्याला दाबीत दाबीत हुलकवण्या देत एक दोन झाडांच्यामध्यें घेऊन योग्य वेळेस चिठूजीला झाडावर चढायास इशारा करून त्याच्याकडून त्याच्या शिंगांस अचानक चौराडी घालवून मालोजीनें आपण स्वतः मोठ्या शिताफीनें चौराडीचा सरफास आवळला, आणि त्या अवजड व बिथरलेल्या जनावरास झाडाला खिळवून टाकिलें. नंतर त्या गवळ्याकडून त्याला पेंड वगैरे खावयास लावून हळूच त्याची तुटलेली वेसण मालोजीनें मोठ्या धैर्यानें फिरून घातली, व झाडाचा सोडून त्याला मोकळा वेसणीस धरून तो चालूं लागला.

इतका प्रकार होतो न होतो तोंच शिकारीच्या मागें गुंतलेले जयपाळराव नाईक धाकटे निंबाळकर यांची खासा स्वारी तेथें येऊन थडकली. त्यांच्याबरोबर त्यांची बहीण दिपाबाईही होतीच. त्यांनीं ही सर्व काय भानगड आहे हें विचारून घेतलें, तेव्हां आपल्या शिकारखान्यावरील व तालिमखान्यांतील लोकांची झालेली धांदल, व या अपरिचित, अगदीं तरुण अशा दोन मुलांनीं आपल्या साथीदारांसह खटपट करून कशा शिताफीनें व साहसानें एवढें थोरलें मस्त जनावर हातचें सुटलेलें फिरून पकडलें वगैरे सर्व मजकूर माना खालीं घालून त्यांच्याच आश्रितांस सांगावा लागला. दिपाबाईला ही सर्व हकीगत ऐकून रेडा पकडणाऱ्या तरुण मर्दाचें फारच कौतुक वाटलें. तिनें त्याच्याकडे आपली नजर लाविली आणि भावाबरोबर मोठ्या उत्सकतेनें ती त्याच्यासमोर जाऊन उभी राहिली.

मालोजीरावास शंभू व रमा यांची आठवण झाली व रेडा देऊन ' मंडळी पुढें माझी वाट पाहत असतील, मी जातों, संभाळा आतां नीट ' असें सांगून तेथून हळूच काढता पाय घेण्याचा त्यानें विचार केला. रेडा धरण्याच्या धांदलींतच रेडा कोणाचा वगैरे चौकशी त्यानें केली नव्हती, व आतां ही नवी मंडळी येतांच नुसत्या सांकेतिक विचारपुशीनेंच त्यानें ती कोण ही माहिती काढून घेतली. जगपाळराव व दिपाबाई हीं जवळ आलेलीं जणुं आपण पाहिलींच नाहींत असा बहाणा करून तो चालता होण्याच्या बेतांत होता, इतक्यांत जगपाळरावानें आपण होऊनच त्या गवळ्याला उद्देशून 'तुमचा हा खंड्या तुमच्या हातीं लागला फिरून, नाहीं तर तुमची झालीच होती बहुतेक तिरपीट.—पण थांबा त्यांना जाऊं देऊं नका. ' अशी बोलण्यास सुरवात केली, तेव्हां मालोजीला थांबणेंच आलें.

**बा**०—( मालोजीचा हात धरून, ) व्हय सरकार, ह्या जवानानं आज बूज राखली. फार चपळ आन् आक्षि निधड्या छातीचा बघा. न्हाई तर ह्ये आपले पहिलवान गडी नव्हत का! उगच छात्या वर का—काढून आन् तोऱ्यानं चालावं मात्र ह्येनीं. धा धा पाच पाच शेर दुधं खावी पुन येळ आली कि बघा घातलंच शेपूट रंडकीच्या कुत्र्यावाणी. ( मालोजीस. ) राव ह्ये नाइक छोटे सरकार आमच. लाख माणूस हैती बघा आक्षि, लई गुण घेणार. कुठं बी असो मंग तो.

**मा**०—( सलाम करतो. जगपाळराव त्याला उलट सलाम कारितो. ) शंभुमहादेवाच्या कृपेनें हा एक सुयोगच आला नाइकांची व आमची गांठ होण्याचा. तरी पण

माझ्याबरोबर दोन लहान मुलें आहेत. तीं मीं पुढें लावून दिलीं आहेत आमच्या धर्माजीबरोबर. त्यांच्या खाण्यापिण्याची कांहींच तजवीज मी गेल्यावांचून व्हायची नाहीं, त्यामुळें माझा नाइलाज आहे, मला गेलेंच पाहिजे. गरीब बिचारीं मुलें रस्ता चुकून अनाथासारखीं आज दोन दिवस भटकत होतीं. त्यांतच त्या मुलीवर—दीन गाय ती—तिच्यावर कांहीं वात्रट मुसलमानांच्या शेफारलेल्या पोरांनीं डोळा ठेवून लांडग्याप्रमाणें झडप घातली. तिचा भाऊ व ती त्या लांडग्यांस जिवावर उदार होऊन सारखीं प्रहरभर हुलकावीत होतीं. इतक्यांत आतां अगदीं आपण सांपडणारच त्या वाघांच्या जबड्यांत असें वाटून त्या मुलीनें व तिच्या भावानें मदतीकरितां मोठ्यानें आरोळ्या मारल्या, त्या ऐकून मी धांवून गेलों व मोठ्या कष्टानें तिची मुक्तता केली. तीं दोघेंही भुकेनें व तहानेनें अगदीं व्याकुळ झालीं असतील.

**ज०**—पुढें कुठें ? या झाडींतल्या वाडींतच ना ? आमचाही मुक्काम तिथेंच आहे आजचा. चला आपण बरोबरच जाऊं आतां. (दिपेकडे वळून.) या आमच्या ताईलाही आतां भूक लागली आहे.

**दिपा**—खरंच दादा! चलाच आतां लवकर. माझ्याबरोबर पुष्कळ फराळाचें आहे. मी मोठ्या आनंदानें त्या बिचाऱ्या मुलांस घेऊन फराळ करीन. (मालोजीकडे पाहते.)

**मा०**—चला तर!

असें ह्मणून दिपा, जगपाळराव, मालोजी, विठूजी आणि त्यांच्याबरोबरची मंडळी मिळून सर्व चालूं लागली.

मागून साकीचा खटराही येतच होता. दिपेनें विठूजीबरोबर बोलण्याचा उपक्रम केला, आणि त्याच्या तोंडून सर्व हकीकत मोठ्या कौतुकानें ऐकून घेतली. मालोजी व जगपाळराव ह्या दोघांची गट्टी जमून त्यांच्या गप्पा चालत होत्या. मालोजीचें नांव गांव वगैरे सर्व हकीकत जशजशी जगपाळरावांस कळत गेली तसतसें त्याचें मन अनेक प्रकारच्या तरंगांनीं भरूं लागलें. त्याची मालोजीरावाबरोबर कुस्ती खेळून तींत जय मिळविण्याची खात्री डळमळूं लागली. तथापि त्याची ईर्षाही वाढत चालली, व मालोजीशीं कुस्ती धरून तींत आपणास जय कसा येईल, या विचारांत त्याचें मन सारखें घुटमळूं लागलें. असो! आपण आतां ह्यांस येथेंच सोडून जरा पुढें जाऊं.

मागें ध्वनित केल्याप्रमाणें मल्हारभट्टांचे चिरंजीव लक्ष्मणभट्ट वाराणशीच्या यात्रेस तर गेलेच. जातांनां ते उत्तरेकडून सिद्धपूर, द्वारका वगैरे पश्चिम तीर्थें करून मग आपल्या राजस्थानांतील पुष्कर, एकलिंग, दुर्गामाता वगैरेच्या दर्शनार्थ पूर्वेस वळले. इतके जवळ गेल्यावर आपल्या पूर्वजांनीं यजमानासहित जेथें पूर्ण वैभव, स्वातंत्र्य व शांतिसाम्राज्य भोगिलें त्या मेवाड देशाची, तेथील हम्मीरवंशज राण्यांची कशी काय स्थिति होती तें पाहिल्यावांचून त्यांच्यानें राहवेनाच. ह्मणून ते उदेपुरासही गेले. तों तेथें काय? सर्व बेबंदशाहीच झाली होती. राजा बाल, मंत्री स्त्री, आणि अकबरासारखा यौवनमदानें व राज्यमदानें धुंद झालेला पक्का कावेबाज शत्रु डोळ्यांत तेल घालून मेवाडच्या सर्वस्वाच्या नाशाकरितां अगदीं टपून बसलेला. जयपूरवाले, जोधपूरवाले वगैरे इतर मोठमोठे रजपूत राजे आ-

पल्या मुली अकबरास व त्याच्या कुटुंबीयांस देऊन निर्लज्जपणानें त्याचे अगदीं दास बनून राहिले होते. या स्वदेश व स्वधर्मद्रोही, जात्याभिमानशून्य मानसिंग, मालदेव प्रभृति क्षत्रिय राजांच्या सैन्यसामग्रीनें, बेडूक खाऊन फुगलेल्या सापाप्रमाणें अकबर हा सिसोदिया वंशाच्या शुद्धतेस दंश करून ती साफ नाहींशी करण्यास संधी पाहत होता. अशी ही सर्व स्थिति कळल्यावर लक्ष्मणभट्टांस अत्यंत दुःख झालें. त्यांनीं त्याबद्दल पुष्कळ विचार केला; परंतु शेवटीं "कालाय तस्मै नमः" ह्मणून त्यांनीं पुढें मार्ग सुधारला.

गयेस गयावर्जनादि सर्व धर्मकृत्य यथासांग आटोपून वाराणशी विश्वेश्वराचें दर्शनपूजनादि भक्तिभावानें करून तेथें त्यांनीं यथाशक्ति गोब्राह्मणसंतर्पणही केलें. इकडेही यावनी अंमलाचा प्रखर उन्हाळा भासत होताच. तथापि हिमालयाच्या सान्निध्यानें कीं काय कोण जाणे दक्षिणेपेक्षां अथवा पश्चिमेपेक्षां त्याचा ताप येथें बराच कमी भासत असे.

येतांनां जगन्नाथ, हंपी, विरूपाक्ष, रामेश्वर वगैरेकडून येण्याचा संकेत करून त्याप्रमाणें त्यांनीं आपला संकल्प शेवटासही नेला. या त्यांच्या दक्षिणतीर्थप्रवासांत त्यांस विजयानगरच्या हिंदुराज्याची धूळधाण होऊन येथें इमामशाहीचा वरवंटा फिरलेला पाहावयास सांपडला. कुजत पडलेल्या शवांत उत्पन्न होणाऱ्या क्षुद्र किडयाप्रमाणें त्या विजयानगरच्या अफाट दक्षिण साम्राज्यांतून उत्पन्न झालेलीं परस्परविघातक छोटीं छोटीं पुंड पाळेगारांची संस्थानेंही त्यांच्या पुष्कळ दृष्टीस पडलीं. विजयानगरकरांच्या नाशार्थ एकमेकांवर तिलांजली घेऊन सारखे उभे असणारे

ब्राह्मणी पादशाहीपंचकाचे सुलतान एवढ्यापुरते कसे एक झाले वगैरे सर्व हकीकत ऐकून कर्माच्या गहन गतीबद्दल व दैवाच्या विचित्र खेळाबद्दल त्यांस खरोखरच अत्यंत उद्वेग झाला. सर्व हिंदुस्थान चौफेर व्यापून 'दशांगुळें उरला' असला हा इस्लामशाहीचा वणवा पाहून त्यांच्या मनाचा जो संताप झाला व त्यांस जो क्षणोक्षणीं विस्मय वाटून खेद झाला त्याचें स्वरूप चितारणें आमच्या लेखणीच्या शक्तीबाहेर आहे. त्यांस असें वाटे कीं, या पेटलेल्या राक्षसी वणव्यांतून जीवंत राहून फिरून आपल्या लोकांचें वर डोकें निघणें ह्मणजे केवळ मुसळाला अंकुर फुटण्यापैकींच आहे.

पारतंत्र्यानें यापूर्वीं या महाराष्ट्रास आपलें भयंकर विराट् स्वरूप इतकें स्पष्ट कधींच दाखविलें नव्हतें. लक्ष्मणभट्टास तर तें विशेष दिसलें. कारण प्रवासाचे सहस्रनेत्र व शतसहस्र कान त्यांना प्राप्त झाले होते. तें प्रखर कालकूट विषाच्या वाफा सोडणारें पारतंत्र्य दावानलाचें तेज त्यांना नखशिखांत होरपळूं लागलें. तो दाह शमन होण्याकरितां त्यांनीं पुष्कळ विवेकामृताचे घुटके घेतले; परंतु कांहीं वळेना. जेथें जात तेथें त्यांनीं तेथील देवाचीं तो दाह शमन होण्याकरितां अनन्यभावानें स्तोत्रें गावीं; करुणा भाकावी; उपनिषदें, गीता वगैरेंतील सिद्धांतांचा विचार करावा; रामायण, भारत, भागवत यांतील देवादिकांवर आलेल्या वनवासादिकांचा विचार करावा; परंतु तीं सर्व पुराणांतील वांगीं पुराणांत राहून फिरफिरून त्यांचें मन या घडलेल्या भयंकर क्रांतीच्याच, मेंदूचें पाणी करून सोडणाऱ्या विचारांत मग्न होत असे. असो! याप्रमाणें

मोठ्या प्रयासानें, अत्यंत दगदगीनें व जागजागीं उद्वेग-जनक देखावे पाहत त्यांनीं आपल्या तीर्थयात्रा संपविल्या, व ते परत देऊळगांवास येण्याच्या विचारास लागले. तों त्यांस सहज आठवण झाली कीं, आपण शिखरशिंगणापुरास जावें हेंच बरें. तेथें भक्तवर शांतलिंगबावांचें दर्शन घ्यावें, देवाचेंही पूजन करावें, यात्रेचा समारंभ पाहावा व बहुतकरून मालोजीविठूजीही तेथें आलेच असतील, त्यांचेबरोबरच घरास जावें. याप्रमाणें विचार करून ते मजल दरमजल करीत महादेवाच्या पायथ्याशीं वावरहीर येथें निंबाळकर नाइकांकडे येऊन दाखल झाले. तेथें लक्ष्मणभट्टजींचा चांगल्याच प्रकारें सत्कार झाला, आणि नाइकांनीं भट्टांपासून त्यांच्या प्रवासाची सर्व हकीकत मोठ्या उत्सुकतेनें ऐकून घेतली.

गोष्टीवरून गोष्ट निघतांनिघतां दिपाबाईच्या लग्नाचीही गोष्ट नाइकांनीं लक्ष्मणभट्टांजवळ काढून त्यांस कोणी तिच्या योग्य एखादा नवरा मुलगा आढळला असल्यास विचारलें. लक्ष्मणभट्टांसही दिपेच्या लग्नाची गोष्ट निघतांच आपल्या पूज्य पित्याच्या शेवटच्या उपदेशाचें स्मरण झालें; व ‘ ईश्वरकृपेनें जर ह्या निंबाळकरांशीं आपल्या यजमानाचा शरीरसंबंध जुळून येईल तर आपल्यास आपल्या सर्व तीर्थयात्रेचें फळ मिळालें असेंच आपण समजूं ’ असें ते मनांत ह्मणूं लागले. त्यांनीं, खरोखरी उच्चकुलांतील मानधन क्षत्रियांचा गरीबीमुळें त्या वेळीं कसा कोंडमारा झाला होता, सर्व हिंदुस्थानभर पेटलेल्या इमामशाहीच्या प्रचंड वणव्यांत कितीएक पवित्र कुलें अज्ञातवासांत केवळ गरीब कुणब्यांप्रमाणें कशीं दिवस काढीत

होतीं, वगैरे प्रकाराचें मोठें हृदयद्रावक चित्र मालोजीनाइकांपुढें ठेवून असल्या ह्या विषम स्थितींत कूळ, शील व संपत्ति या तिन्ही गुणांनीं प्रतिष्ठित असा नवरा मिळणें दुर्घट होतें, हें त्यांना चांगलेंच पटविलें. नाइकांचा अनुभवही तसाच असल्यामुळें हा लक्ष्मणभट्टजींचा दुजोरा त्यांना मिळतांच त्यांनीं सहज उद्गार काढले कीं, ' संपत्ति नसली तरी चालेल एक वेळ; परंतु मुलगा कुळानें, शीलानें, त्याचप्रमाणें शरीरसंपत्ति, पराक्रम व व्यवहारज्ञान इतक्या गुणांनीं तरी पूर्ण असावा. मग त्याला त्याचे दिवस साधारण सुखांत जाण्यापुरता श्रीमंत करण्यास आज मला तरी अनुकूळता नाहीं असें नाहीं.' हे मालोजीनाइकांचे उद्गार ऐकतांच लक्ष्मणभट्टांस बराच धीर आला, व त्यांनीं पर्यायानें नांवगांव न सांगतां आपल्या यजमानांचे गुण, शील व परिस्थिति यांचें इत्थंभूत वर्णन करून ' बवा, इतपत पटेल स्थळ आपणांस? ' असा जरा जोराचा प्रश्न केला. नाइकांनींही ' हो, इतपत स्थळ मिळाल्यावर हो काय हवें? आपल्याला पसंत आहे. ' असें उत्तर दिलें.

इतक्यांत तिकडून दिपाबाई तेथें आली. तिनें लक्ष्मणभट्टांस पाहतांच जरा थबकल्यासारखें केलें व लागलीच बापाची व तिची दृष्टादृष्ट होऊन तिनें त्यांस नमस्कार केला. भट्टजींनींही तीस रीतीप्रमाणें आशीर्वाद दिला व ' नाईक! याच आपल्या दिपाताई नाहीं का?' असा प्रश्न केला. नाइकांनीं 'होय' ह्मणून मान हालविली. दिपेनें आपल्या बापाजवळ बसून भट्टजींची नेत्रसंकेतानेंच चौकशी केली. तों बापानें तिला भट्टजी कोठले, काय वगैरे सर्व सांगून विनोदानें ' तुला

नवरा पाहावयास सांगतों आहें मी त्यांस–' असें ह्मणतांच ती लाजून उठून घरांत गेली. इकडे भट्टजींनीं 'सायंस्नानार्थ तळ्यावर जाऊन येतों' ह्मणून रजा घेतली.

दिपेला मालोजीरावानें रमेची त्या मुसलमानांच्या हातून सुटका केल्यासंबंधाच्या व आपल्या टकरी रेड्यास तो वेसण तुटून सुटला असतां मोठ्या शिताफीनें पकडल्यासंबंधाच्या गोष्टी बापाजवळ सांगण्यास हा वेळपावेतों प्रसंगच आला नव्हता. तिचें मन मालोजीरावानें बरेंच वेधलें होतें. तेव्हां त्याच्या पराक्रमाच्या गोष्टी सांगण्यांत तिला बरेंच कौतुक वाटत असे. तिनें तो सर्व पाढा बापाजवळ वाचला, आणि मधूनमधून मालोजीची पुष्कळच तारीफ केली. तसेंच आपल्या तालीमखान्यांतील पहिलवानांबद्दल बरेच वेळां तिरस्कारयुक्त उद्गारही काढिले. शेवटीं ती ह्मणाली, 'खरंच बाबा हे मुसलमान किनई पण आतांशा फारच शेफारले आहेत; पण आपले चांगले धट्टेकट्टे पुरुषांसारखे पुरुष सगळे मेले जसे शेंदाडशिपाई! एकसुद्धां त्या टवाळ मुसलमानांच्या कार्ट्यांची खोड मोडण्यास धजत नाहीं. खरेंच धन्य त्या छोट्या पाटलाची! त्या दोघां भावांनीं मात्र आपल्या आईचा कुसवा धन्य केला.' 'खरेंच अनाथांचें रक्षण करणें, जिवाची पर्वा न करितां धर्मच्छलकांची खोडकी मोडण्याचा यत्न करणें, गाई, स्त्रिया, मुली व बाल यांचें संकट दूर करणें, व विशेषतः परस्त्रीच्या पातिव्रत्यावर हल्ला करून तिला भ्रष्ट करूं पाहणाऱ्या नराधमांचा ते सांपडतील तेथें समाचार घेणें हें मर्द ह्मणविणाऱ्याचें-प्रत्येक क्षत्रियाचें-आद्यकर्तव्य होय, आणि तें जो करितो त्यानें आपल्या जन्माचें सार्थक केलें असें तूं जें ह्म-

टलेंस तें खरेंच आहे, बेटा.' याप्रमाणें नाइकांनीं दिपेच्या ह्मणण्यास आपली संमति देऊन ते ह्मणाले 'बेटा त्या छोट्या पाटलांस आपण शेलापागोटें बक्षीस देऊं. अशा तरतरीत तरुण मर्दांचें कौतुक करून त्यांस उत्तेजन देण्याचा माझा लहानपणापासून परिपाठ आहे. ते आपल्याला शिखरावर भेटतीलच. बरें पण ती रमा आणि तिचा तो भाऊ कोठें आहेत आतां ? त्या बहीणभावंडांसही मला एकदां पाहण्याची इच्छा आहे. जातिवंत मराठ्यांच्या अनाथ मुलांचा परामर्ष घेणें आपलें कर्तव्य आहे.'

दि०—बाबा, तीं त्या तळ्याजवळच्या, महादेवाच्या देवळांत आहेत, चला तुह्मी येत असाल तर मी दाखवितें तुह्मांला. मला ती रमा किनई फारच आवडते. किती सुंदर मुलगी आहे ती ह्मणून सांगूं ? एखाद्या राजाची राणीच शोभेल! तिचा भाऊ तो शंभूही कसा चांगला मुलगा आहे. दोन्ही बहीणभावंडें कशीं नक्षत्रांसारखीं आहेत. खरेंच बाबा, चलाच तुह्मी. नाइकांनींही दिपेचा आग्रह फुकट जाऊं दिला नाहीं. त्यांनीं लगेच एक हुजऱ्या बरोबर घेऊन दिपेसह त्या महादेवाच्या देवळाची वाट धरली.

---

## प्रकरण ९ वें.

वसंताच्या आरंभाचे दिवस, संध्यासमय, सूर्य अस्तास जात असलेला पूर्व दिशेचें सर्व सौभाग्य पश्चिमेस आलेलें. पश्चिमेकडून सुमंद, सुगंध, शीतल वायू वाहत होता. पक्षी आपापल्या घरट्यांस जाण्यासाठीं घाईघाईनें इकडून तिकडे उडत होते. पूर्वेकडे अंधार आपला अंमल

जास्तजास्त जोरानें बसवीत चालला होता अशा सुखद वेळीं शांतता, उल्हास, आनंद इत्यादि मनोवृत्तींस साहजिकच उत्तेजन मिळत असतें; व मनुष्याच्या मनांतील उच्छृंखल मनोविकार या वेळीं सर्व आपोआपच लीन होतात. अशा वेळीं ईश्वराचें अगाध कर्तृत्व, त्याचें सृष्टिरचनाचातुर्य आणि एकंदर तन्निर्मित विराट् विश्वस्वरूपाबद्दलचें परम कौतुक अनुभवण्यास मनुष्याचें मन अगदीं तयार असतें. अर्थात् कृतज्ञता, भक्ति, श्रद्धा वगैरे वृत्तींस पोषक असा हा संध्यासमय ईश्वराच्या चिंतनास अत्यंत योग्य असा आपल्या ऋषिवरांनीं निवडून काढल्याबद्दल त्यांचें जितकें अभिनंदन करावें तितकें तें थोडेंच होणार आहे, असो ! अशा प्रकारचा समय. स्थलही तसेंच रमणीय. चहूं बाजूंनीं सह्यशिखरें आकाशासही भेदून वर जातांनां दृष्टीस पडताहेत, मधल्या खोऱ्यांतून व पायथ्याशीं दाट चिंचेची झाडी लागून राहिली आहे, क्वचित् ठिकाणीं लहानलहान टुमदार बागांतील चौफेर लावलेले सुरू सरळ हारीनें आपलीं डोकीं वर काढून आसमंताद्भागीं चालत असणाऱ्या वाटसरूंस आपल्या अमलांतील सुंदर बागांत विश्रामार्थ बोलावीतच आहेत कीं काय असा भास पाहणारास होत आहे. अशा प्रकारचें स्वभावतः मनोहर सृष्टिवैभव येथें जसें खुलून राहिलें होतें. अशी वेळ, असा प्रदेश, आणि त्यांतच मध्यभागीं एक हेमाडपंती देऊळ असून त्यावरील निशाण सारखें फडफडत होतें. हें देऊळ भव्य होतें. त्याच्याचसमोर एक सुंदर बाग होता. त्यांत प्रथम कुंपणाशेजारींच सारखे चौफेर सुरू लावले होते. त्याच्या आंत योग्य अंतरावर आंब्याचीं झाडें

होतीं. मध्यें कांहीं जांभळीचे वृक्षही होते. आंवळ्या, राय-आंवळ्या, पपनस, साखरलिंबू, डाळिंब, वगैरे विविध फळझाडें व्यवस्थेनें लावलेलीं होतीं. बेल, बकुळी, सोनचाफा, पांढरा चाफा, नागचाफे, वगैरे पुष्पवृक्ष होते. त्यांनाच लागून चमेली, मोगरा, मदनबाण, जाई, जुई या फुलवेलींचे मांडव होते. मधुमालती, शेंवती, कांटेशेंवती यांना येथें स्थान मिळालें असून अगदीं मध्यभागीं तुळशी, पाच, मरवा यांचेही वाफे होते. कोंपऱ्यावरून अगदीं कुंपणाच्या कडेस केवड्याचीं झाडें होतीं. आंत पाटाचें पाणी खेळविलें होतें. पायवाटा काढल्या होत्या. हरळीचे गालीचे होते. जागजागीं चार दोन माणसांस बसतां येण्यासासारखे चौथरे होते. अशा प्रकारच्या बागेंत आणि वसंतऋतूच्या अव्वल अमलांत कामी व मुग्धतरुणजनांस उत्तेजक सामग्रीस काय वाण ?

आंब्यास मोहोर येऊन फळेंही धरलेलीं. जांभळी, राय-आंवळ्या वगैरेही फलभारानें नम्र झालेल्या. केवड्यांस कणसें आलेलीं. सोनचाफे, नागचाफे, मदनबाण वगैरे सर्व पुष्पवृक्ष व पुष्पवेली यांस बहर आलेला. एकंदरींत या वेळेस ही बाग ह्मणजे मदनाचें केवळ शस्त्रागारच बनून राहिली होती. त्यामुळें, यद्यपि हा शांतिजनक संध्यासमय केवळ ईश्वरचिंतनासच योग्य ह्मणून सुविचारी व जितेंद्रिय ऋषींनीं ठरविला आहे तथापि त्यांच्या त्या नियमास तारुण्याच्या ऐन भरांत असणारीं, अजाण व इंद्रियाधीन अशीं प्राकृत भाषणें न कळून आपोआप अपवाद होतात. तीं मदनवश होऊन तो करवील त्या चेष्टा करून शेवटीं मदनारि जो शंभुमहादेव त्याच्या तिरस्कारास स्वतःस पात्र

करून घेतात; यांत त्यांचा फारसा दोष आहे असें नाहीं. तो दोष त्यांच्या तारुण्याचा व अल्लडपणाचा होय.

डोळ्यांस भ्रम पाडणाऱ्या त्या वेळच्या संधिप्रकाशांत आपल्या अप्रतिम सौंदर्यानें व सुवर्ण गौरकांतीनें केवळ विजेसारखी चमकत असणारी एक चंचलाक्षी मुग्धयुवती वरील बागेंत लपतलपत, अडखळत, वरचेवर साशंक परंतु सहेतुक अशा मुद्रेनें मागें, पुढें, बाजूला चाळून-पाळून न्याहाळून पाहत, नुकतीच शिरत होती. तिच्या हातांत एक अपुरा झालेला पुष्पहार व पुष्पगुच्छ होता. क्वचित् ती एखाददुसरें फूल त्यांत ओव्यांतून काढून अथवा नवें तोडून ओंवीतही होती. क्वचित् वाऱ्यानें, क्वचित् एखाद्या वेलीस सोगा अडकून, क्वचित् अडखळ-ण्यानें वगैरे तिचा पदर स्थानच्युत होत असे. लज्जा, भीति, शंका, आशा वगैरे मनोविकारही निरनिराळ्या प्रकारच्या प्रकाशलहरी तिच्या मुद्रेवर सारख्या खेळत असत. ही अप्सरा मग अशा कोणत्या शुकाचार्यास अथवा वसिष्ठवामदेवास मोहावयास जात होती कोण जाणे. तिचे चंचळ नेत्र तर तिच्या त्या वेळच्या चंचळ झालेल्या मनाशीं जणुं स्पर्धाच करीत होते. चालतांनां तिचीं पावलें ही कित्येक वेळां जमीनीला पुरतीं टेंकतात किंवा नाहीं याचाही संशयच. वाऱ्यानें तिचे कुरळे केश भुरुभुरु उडत होते. तिच्याशीं विनोद करावासा वाटूनच कीं काय त्यानें तिची अगदीं रळी मांडली होती. तो तिचा पदर ओंचे वगैरे वरचेवर उडवीत असे आणि त्या भीरूस ते सावरतां सावरतां व कपाळपट्टीवरील केश मागें सारतां

सारतां अगदीं पुरेसें झालें होतें. त्या वेळीं तिची जी धांदल उडे ती खरोखर अवर्णनीयच होय.

ज्या कोणा सभाग्याच्या मनास वेधण्याकरितां ही तरुणी मोठ्या आशेनें चालली होती तो तरुण तिला तेथें कोठेंच दिसेना, त्यामुळें निराशेच्या ढगांनीं तिच्या सौंदर्य रवीचें तेज कमजोर किंबहुना अगदीं नाहींसें होऊं लागलें होतें. ती फारच बावरली. तिचा तो पहिला उल्हास अस्तास जाणाऱ्या सूर्याची बरोबरी करण्याकरितांच जणुं क्षणैक मावळला, तथापि तो विजेच्या चंद्ररूपानें फिरून किंचित् काळ तरी उगवणार होता खास.

तिच्यापासून बऱ्याच अंतरावर बागेच्या कोंपऱ्यावर असलेल्या एका केवड्याच्या झाडावर एक तरुण कणीस काढून खालीं उतरत होता. त्याची नजर या तरुणीवर अचानक पडून त्याला असें वाटलें कीं ‘ ही विजेची चंद्रकोरच उगवली. ’ तो अधिक न्याहाळून पाहूं लागला. परंतु त्या तरुणीचें मुख त्याला फिरून दिसेना. कारण तिच्या सहज गतीनें त्याच्याकडे तिची पाठ झाली. तथापि, एकदम कांहीं स्मरण झाल्यासारखें होऊन तो तरुण झपाझप खालीं उतरला. इकडे ती तरुणी आपला हार संपवून त्याला गांठी मारीत होती. हा तरुण मर्द खालीं उतरून हलकेंच पाऊल न वाजवितां व झाडाच्या आडून त्या तरुणीच्या नजीक येऊं लागला. होतां होतां तो तिची नजर चुकवून तिच्या मागच्याच अंगास असलेल्या एका सोनचाफ्याच्या झाडाआड उभा राहिला. या चाफ्याच्या वृक्षास लागूनच चमेलीचा मंडप होता. त्यावरील एक चमेलीची सुंदर, अगदीं उमलण्यास झालेली अशी कळी

तोडून तो आपल्याशींच ह्मणाला. "अहाहा ! ईश्वरा, आह्मां मनुष्यांच्या सुखाकरितां तूं या काय काय तरी तजविजी केल्या आहेस. ही चमेलीची मुग्ध कळी किती तरी सुंदर व सुकुमार आहे ! इचा सुवास किती मधुर व आल्हादकारक तरी हा !" हा याप्रमाणें आपल्याशींच परंतु सोद्देश कांहीं बोलत होता तों तिकडे ती तरुणी एका चौथऱ्यावर बसून आपला पुष्पगुच्छ पुरा करण्याच्या गडबडींत अगदीं गुंग झाली होती. तथापि स्त्रीजातीच्या स्वाभाविक भीरुतेनें व लज्जेनें तिच्या चंचल नेत्रांस व कानांस या वेळीं एखाद्या शतावधान्याप्रमाणें सामर्थ्य प्राप्त झालें होतें. त्यामुळें तिला, आपल्या मागें कांहीं चाहूल असल्याचा व अस्पष्ट परंतु कांहीं शब्द होत असल्याचा भास झाला. ती ताडकन उठली व इकडे तिकडे कावरीबावरी होऊन पाहूं लागली. तों तो तरुण गृहस्थ चपलाईनें एकदम जवळच्याच मंडपाआड लपला. तिनें तो पुष्पगुच्छ कसा तरी पुरा केला व ती तें ठिकाण सोडून जाऊं लागली. तथापि स्त्रीजातीची स्वभाविक भीति व लज्जाही तिला फार जाचूं लागली. 'आपणांस कोणी तरी पाहिलें खास—आणि तो गृहस्थ कोण असावा हें तर कांहींच कळेना. तो मनुष्यच असेल किंवा कोणी पिशाच्च तर नसेल अशीही कल्पना तिच्या मनांत आली, आणि ही कल्पना मनांत येतांच तिची फारच घाबरगुंडी झाली. कारण कोन्या तिनसांजेची वेळ असल्यानें, व तो प्रदेश निर्जन असल्यानें त्या तिच्या कल्पनेस जास्तच जोर आला. तिची ही स्थिति पाहून त्या तरुणास अर्थातच फार कौतुक वाटलें. त्याला एकवार असें वाटे कीं, आपण

एकदम जाऊन तिजपुढें उभें राहावें. परंतु फिरून असेंही वाटे कीं, नको, इची अशीच आणखी थोडीशी मौज करावी, व ती अगदीं अशरण झाली ह्मणजे मग तिला भीतिमुक्त करण्याचा बहाणा पुढें करून आपण प्रकट व्हावें. ह्मणून त्यानें फिरून तिला थोडी चाहूल देण्याच्या उद्देशानें पुढील वाक्यें हलकेंच परंतु किंचित् घोगऱ्या आवाजानें उच्चारिलीं. ' ही सुवर्णलतिका किती तरी कोमल आहे ! मी इच्याच संगतींत धन्यता मानीन.' हे उद्गार त्या तरुणीच्या कानावर गेले, व ती चपापून फिरून इकडेतिकडे पाहूं लागली. त्यांतल्यात्यांत ज्या दिशेनें आवाज येतो असें तिला प्रथम वाटलें, त्या बाजूला तिची नजर जास्त ठरली. त्या वेळच्या तिच्या त्या कटाक्षांनीं त्या तरुणाचें चित्त अगदीं पुरें वेधून टाकिलें. तथापि त्यानें प्रकट न होतां एखाद्या पंचाक्षऱ्याप्रमाणें आपला गुप्तमंत्रप्रभाव तसाच चालू ठेवला. सांगावयाचें तात्पर्य इतकेंच कीं ती नवयुवती अगदीं घाबरून गेली. तिचें पाऊल एका जागीं असें मुळींच टिकेना. तथापि तिला तडक एकदम बागेच्या बाहेर जाण्याचाही धीर होईना. वाऱ्यानें बुंधापासून शेंड्यापर्यंत हलणाऱ्या एखाद्या कदलीप्रमाणें तिची स्थिति झाली. 'मी इच्याच संगतींत धन्यता मानीन' हे शब्द तिच्या मनांत सारखे घोळत होते. या धांदलींत तिच्या हातांतील पुष्पगुच्छ व हार हेसुद्धां गळून पडले. तिला त्या गोष्टीचें मुळीं भानसुद्धां नव्हतें. त्याचप्रमाणें आपण कोठें चाललों आहों, व काय करीत आहों याचेंही कांहीं तिला भान राहिलें नाहीं. ती कोठें तरी चालली होती.

तोंच कर्मधर्मसंयोगाचा असा चमत्कार झाला कीं जव-ळच असलेल्या एका सपाट वारुळांतून एक पिंवळा धमक नाग अर्धाच बाहेर आलेला त्या सुंदरीच्या नजरेस पडला. त्यासरशीं अगदीं गर्भगळित होऊन भयानें तिच्या सर्वां-गास डवडवून घाम सुटला, व ती आपल्याकडून ओरडण्या-चा प्रयत्न करीत होती, परंतु बोबडी वळल्यानें शब्द मुळींच उमटेना. इतक्या अवकाशांत तो भुजंग सबंध बाहेर आला व त्यानें आपला मोरचा नीट त्या तरुणी-कडेच केला. मग काय विचारतां? तिची एकाएकीं अशी स्थिति कां झाली असावी, असा विचार मनांत येऊन तो पुढें येणार तोंच त्या तरुणासही त्याच्या डोळ्यांनीं तिच्या भयाचें कारण जाणविलें व तोही मोठ्या पंचाइतीं-तच पडला. 'आपण भिऊं नका, घाबरूं नका, स्तब्ध असा, वगैरे आश्वासनाचीं वाक्यें त्याच्या कंठापर्यंत तेव-ढ्या वेळांत कितीदां आलीं व कितीदां परत गेलीं. कारण, नुसत्या शाब्दिक आश्वासनानेंच काम होईल किंवा नाहीं याची शंका वाटण्यासारखाच प्रसंग असल्यानें त्यापेक्षां करावी लागणारी कृति करणें चांगलें किंवा वाईट याच विचारांत तो गुंग झाला. परंतु त्यानें हलकें-हलकेच, तो काय निमूटपणें चालता होईल. देवाचा प्राणी, तो कोणाला दुखवणार नाहीं, असें मनांत आणिलें व एकएक पाऊल तो तिच्या जवळजवळ जाऊं लागला. सर्प अगदीं निकट आला व त्यानें सहजगत्या आपली फणा वर केली; तों त्याच्या नजरेस हीं माणसें पडून प्राणाच्या भीतीनेंच त्यानें एक फुत्कार टाकिला, व पुढें झेंपावत तो सळकन् त्या तरुणीच्या अगदीं जवळून तीरा-


सारखा डोळ्यांचें पातें लवतें न लवतें इतक्यांत समोरच्या केवडयाच्या जाळींत निघूनही गेला. पण इकडे तिला हा आपणास आतां खास चावतो असें वाटून तिचे डोळे मिटले व ती एक आरोळी ठोकून भीतीच्या धक्यासरशीं त्या तरुणाच्या बाजूला धाडकन् कोसळली.

तो तयारच होता. त्यानें प्रसंगावधान राखून त्या सर्पावर नजर ठेवून एकीकडे हिलाही अचानक सांवरून धरिलें, व तो सर्प विरुद्ध दिशेस पार निघून गेला, अशी खात्री होतांच त्यानें हलकेंच आपल्या अंगवस्त्रावर तिचें डोकें ठेविलें व जरा ती जागृतींत यावी म्हणून झटका दिल्यासारखें करून तिच्या कमरेचा आपला हात त्यानें काढून घेतला. तो पुष्पगुच्छ तिच्या डोळ्यावर ठेवून तो हारही त्यानें तिच्या छातीवर ठेवला. त्याला—

**लज्जेनें भीतीनें मज सोडुन सुंदरी निघे जाया ।**
**तों ये अरि तिस हित मज त्या ठायां सर्प तीस बुझवाया ॥**

ही कविता आठवली. तिनें डोळे उघडले; व चटकन् फिरून लज्जेनें कावरीबावरी होऊन ती उठली. तों डोळ्यांवरून गळून पडलेला तुरा व पदरास अडकलेला हार तिच्या नजरेस पडून ती जास्तच खजील झाली. आपल्यावर आलेलें प्राणघातक संकट दूर करणारा कोण हें ध्यानांत येऊन कृतज्ञतेनें तिचें हृदय अगदीं भरून गेलें. 'ईश्वरा या प्राणदात्या सुंदर पुरुषास मी काय देऊं? काय दिल्यानें याचे उपकार फिटतील? हे महापुरुषा, मी आपणास काय द्यावें? माझ्याजवळ आपल्या या वेळच्या उपकारास योग्य असें देण्यास काय आहे? ईश्वर आपणास

सुखासमाधानांत ठेवो. हा सुमनांचा हार मी तुह्मांस देत्यें. तो आपण घेऊन आपल्या उपकाराच्या ओझ्याखालीं दडपून गेलेल्या माझ्या मनास आपण येथें थोडें तरी मोकळें करावें अशी माझी विनंति आहे. एवढी आपण मान्य करावीच.' अशा प्रकारानें भीत-भीत, लाजत व अत्यंत लीनदीन होऊन हलक्या व केंविलवाण्या स्वरानें ती तरुणी त्या तरुणास त्याच्याकडे आपलें तोंड सबंद न फिरवितांच विनवूं लागली व हात वांकडा करून ती तो हार व तुरा त्यास देण्याकरितां उभी राहिली. त्यानें तो हार व तुरा मोठ्या कष्टानें–अर्थात् वरकरणी मात्र–घेतला व तसें होतांच तो कांहीं तिच्याशीं बोलणार तें ऐकण्याची मनांतून असलेली उत्कट इच्छा बळेंच दाबून, जास्त न थांबतां ती तेथून सरळ चालूं लागली. 'आपण जातां? मी आपणास नको ह्मणत नाहीं. तथापि हा आपण दिलेला सुमनाचा हार व हा कुसुम-गुच्छ मला फार जाचील. माझी माझ्या मित्रमंडळींत फजीती उडवील. ह्मणून ह्मणतों कीं, तो आपला आपण परत घ्यावा हेंच ठीक. आपल्या ह्मणण्यास मी मान दिला. आतां आपण माझें हें मागणें व्यर्थ करूं नये." असें त्याचें बोलणें ऐकून तिच्यानें पुढें पाऊल टाकवेना. ती त्याला उलट ह्मणाली 'आपण ही मोठी कसोटीचीच वेळ आणलीत, तथापि परतंत्र माणसें आपलें मनोगत उघड करण्यासही–' पुढें बोलवेना तेव्हां '–परतंत्र असतात हें मीही जाणतों' असें समस्यापूरण करून तो तरुण तिला आणखी ह्मणाला– 'दिल किसीकूं देना नही, दिलसे देना दिल; नही मिला तो नही मिला, काम दिलसे मत

मिल'. 'आपले हे बोल मी कधींही विसरणार नाहीं, मी जात्यें. मला क्षमा असावी. इथें नाहींच तर वरतीं शिखरावर शंभुमहादेवाच्या पायांशीं तरी फिरून गांठ पडेलच पडेल. असें ह्मणून फिरून फिरून मागें पाहत पाहत ती निघून गेली. तो तरुणही दुसऱ्या बाजूनें तिच्याचप्रमाणें मागें पाहत पाहत हळूहळू मार्गास लागला. दोघांच्या देहांतील स्थलांतर वाढत चाललें त्याच प्रमाणांत त्यांची मनें एकरूप होत चाललीं. हा दिवस शुद्ध द्वितीयेचा असल्यामुळें आकाशांतील चंद्र केव्हां उगवला, व तो आतां अगदीं मावळत असल्यानें केव्हां मावळला हें या दोघांसही कळलें नाहीं. आपणासही आतां पुढें लोकव्यवहार दिसणें कठिणच होय. तेव्हां येथेंच थांबावें व मुळींच नाहीं त्यापेक्षां उशीरानेंही बरें, या न्यायानें संध्यावंदनादि करण्यास लागावें हें बरें.

---

## प्रकरण १० वें.

श्री शंभुमहादेवाची जत्रा आतां सुरू झाली असून रोजच्या रोज भक्तजनांची संख्या वाढतच आहे. आपणास त्या परम दयाळू परमेश्वराचें दर्शन स्वस्थपणानें घेतां यावें अशी प्रत्येकाची दृढतर इच्छा असे; परंतु तसें घडणें मात्र उत्तरोत्तर असंभाव्य होत चाललें होतें. त्यांतून जगांतील इतर व्यवहारांस अनुसरूनच गरीबांची तर फारच तारांबळ होऊं लागली. श्रीमंतांचीं शागीर्दपेशाचीं माणसें त्यांच्याकरितां गर्दी मोडण्यास नेहमीं तयार असल्यानें व पूजारी बडवेही श्रीमंतांपासून जास्त प्राप्तीच्या आशेनें

गरीब लोकांस फार वेळ उभे राहूं न देण्याची आपली शिकस्त करीत असत. शिखरावर पोंचतांच प्रथम धूळदर्शन व नंतर स्वस्थपणानें फिरून विधियुक्त दर्शन, पूजन, अर्चनादि करून आपापल्या शक्तीप्रमाणें परमेश्वरास पुष्पहार, पोषाख, नैवेद्य वगैरे अर्पण करून ब्राह्मणसाधु-संतांचें भोजनादिकांनीं संतर्पण करून मग प्रसाद घ्यावयाचा असा प्रत्येकाचा प्रघात यथासांग चालू होता. भजनी लोकांच्या दिंड्या भजनांत गुंतल्या होत्या. ओंव्यांमधून संन्यासी, वृद्ध, साधू, बैरागी वगैरे लोक अद्वैत-सिद्धांताचें व्याख्यान, श्रवण, मनन वगैरे करण्यांत दंग होते. गोंधळ सुरू होते. रात्रौ कीर्तनेंही होत असत. चौघडे झडत होते. श्रीमंतांच्या महापूजेच्या वेळीं त्यांचे खास वाजंत्री असतच. कर्णा, तुतारी, शिंगें यांची तर गर्दीच झाली होती. एकंदरींत विद्याधरगणांनीं युक्त असें केवळ कैलासच भूतळीं आलें आहे कीं काय असा भास तेथें होत होता.

कुस्त्यांचे आखाडे रोज भरत. गांवोगांवचे तालिम-बाज लोक येत होते. त्यांत कोणी कोणी तर 'आपण केवळ अजिंक्यच आहों' हें सुचविण्याकरितां शिंग लावूनच येत. आमच्या देउळगांवकरांकडून यंदां वाटेल त्याला जोड देण्यांत येत होता; व ईश्वराच्या कृपेनें त्यांत त्यांना जयही येत होता. क्वचित् एखादी कुस्ती खावीही लागे. परंतु एकंदरींत पहिल्या सातआठ दिवसांत मिळून ज्या कांहीं दहा बारा कुस्त्या देउळ-गांवकरांनीं धरल्या, त्या एक दोन खेरीज सर्व त्यांनीं जिंकल्या होत्या. याचा आतां असा परिणाम

होऊं लागला कीं त्यांना कोणी सहसा जोडच मागेनासे झाले. खासा स्वारी मालोजीराजे यांनीं अजून एकही कुस्ती धरली नव्हती. ते अजून शिल्लकच होते. निंबाळकरांनींही या वर्षीं यांच्या खालोखाल फड मारला होता, ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. ज्या दोन कुस्त्या देउळगांवकरांनीं खाल्ल्या त्यांपैकीं एक निंबाळकरांबरोबर असून दुसरी एका अनोळखी परंतु फारच चलाख अशा मराठ्याबरोबर होती. ह्या दुसऱ्या कुस्तींतील राजांकडला गडीही राजांच्या अगदीं भरंवशाचा आणि विशेष प्रीतीचा असा होता. त्याचें नांव धर्माजी. त्यानेंही आपल्या प्रतिस्पर्ध्यास चांगलेंच घोळविलें होतें. कुस्ती अगदीं ठरून झाली. तीन चार वेळां दोघांही गड्यांना आपल्या भूमातेचा आसरा घ्यावा लागला होता. दोघांनींही सर्व प्रेक्षकांस दोन घटका आपल्या मल्लविद्याचातुर्यानें अगदीं थक्क करून सोडिलें. एकमेकांच्या शक्तीचें व युक्तीचें खरें स्वरूप कळून त्या दोघां प्रतिस्पर्ध्यांमधली स्पर्धा कमी होऊन एकमेकांबद्दलचा आदरभाव मात्र वाढत गेला, व पडला कोण आणि हरला कोण हा प्रश्न बाजूला राहून त्या कुस्तीपासून ते दोघेही गडी एकमेकांचे अत्यंत मित्र झाले. मालोजीला या प्रकाराचें फारच कौतुक वाटलें. कारण धर्माजीनें काय किंवा या नवीन गृहस्थानें काय अगदीं मनापासून एकानें दुसऱ्याची चपलता, डावपेंच, शक्ति वगैरेबद्दल स्तुती करावी आणि दोघानींही 'हारजीक ही काय केवळ क्षणिक आहे; तीवर खरी परीक्षा थोडीच आहे' असें बोलावें. धर्माजीचा सात्विक स्वभाव मालोजीला माहीतच होता. शिवाय तो कुस्तींत पडला असल्यानें त्यानें त्या नवख्याची

स्तुती केल्याचें त्याला कांहीं नवल वाटलें नाहीं. परंतु जेव्हां निरभिमानपणानें या नव्या गड्याच्या तोंडांतून, आपल्या धर्माजीच्या कौशल्याबद्दल तारिफेचे उद्गार मालोजीनें ऐकिले तेव्हां त्याला फारच आश्चर्य वाटलें; आणि त्यानें लगेच मनांत ताडिलें कीं 'हा गृहस्थ खरोखर कुलीन असला पाहिजे.' मालोजीची व या नव्या गृहस्थाची फारच दोस्ती जमत चालली, व त्या दिवसापासून मालोजीराजांच्या टोळींतच हे विजयी कुस्तीगीर प्रमुखत्वानें बसूं लागले. तेव्हां ही जी कुस्ती देउळगांवकरांनीं खाल्ली तिच्याही यशाचा वांटा त्यांच्याच बाजूला आला, आणि लोकांत हें उगीच आपसांतच कौतुक झालें असा त्याबद्दल लौकिक झाला. सर्जेरावानें हें—ह्या नव्या गृहस्थाचें नांव—देउळगांवकरांच्या तर्फे आणखीही चारपांच कुस्त्या मारल्या व त्यांत निंबाळकरांचेच तीन गडी एकापेक्षां एक तयार असे चीत केले. धर्माजीनें दोन कुस्त्या फारच उत्तम मारल्या, व द्वादशीच्या दिवशीं सर्जेराव व मालोजी यांची मोठी पाहण्यालायक कुस्ती झाली. त्यांत जगपाळरावास मालोजीचें मल्लविद्याचातुर्य पोटभर पाहावयास सांपडलें. त्याची पण अगदीं खात्रीच झाली कीं मालोजीशीं कुस्ती करणें ह्मणजे कांहीं हलकें काम नाहीं. ही कुस्ती मालोजीनें जिंकली. सर्जेरावानेंही आपली शिकस्त केली व प्रेक्षकांस दोनतीनदां असें वाटलें कीं सर्जेराव ही कुस्ती जिंकणार खास. परंतु शेवटीं मालोजीनें अशी कांहीं पेंचास तोड व तोंडीस नवा पेंच यांची लगट केली कीं शेवटीं सर्जेरावास चारी मुंडी चीत करून टाकिलें. या दिवसापासून मालोजीच्या गड्यांचें कोणीही नांव

घेईनासा झाला. देउळगांवकर या सालीं शिखरावरील फडांत अजिंक्य झाले. मालोजी, धर्माजी, व सर्जेराव या तिघांनीं उरलेल्या तिन्ही दिवशीं 'आपणांस जोड द्यावा' ह्मणून भर फडांत आव्हान केलें, परंतु जोडी मिळाली नाहीं. यापैकीं बऱ्याच प्रसंगीं निंबाळकरांच्या तरुण बायका व मुली फडांत काय चाललें आहे हें जेथून बरेंच दिसेल अशा जागीं बसत असत. त्यांत दिपाही होती. शंभु व रमा हीं दोन्हीही बहीणभावंडें दिपेच्या बापानें आपण होऊनच मोठ्या खुषीनें मालोजीरावांस सांगून आपल्याकडे ठेवून घेतलीं होतीं. तरी शंभु शिखरावर बहुतेक मालोजीरावांबरोबरच असे. रमा मात्र दिपा व तिच्या भावजई वगैरेंत बसत असे. कुस्तीच्या गोष्टी या बायकांत निघाल्या कीं रमा, मालोजी व धर्माजी यांची तर तारीफ करीतच असे; परंतु सर्जेरावाबद्दल जितकी ती चौकसपणा व काळजी दाखवी तितकी त्यांच्याबद्दल नसे. दिपेनें नेहमीं मालोजीरावाचें कौतुक करावें. दिपेच्या भावजईस पुष्कळ वाटत होतें कीं, 'आपले यजमानसुद्धां कांहीं पराक्रम गाजवितील.' परंतु ती तिची आशा फुकट गेली; आणि या तिघींच्या संभाषणांत बरीच चुरस दिसूं लागली. रमेची सर्जेरावाबद्दलचीं कळकळीचीं आणि आदराचीं भाषणें ऐकून दिपा व तिची भावजय ह्या दोघीही तिची फारच थट्टा करूं लागल्या. दिपेचीही मालोजीसंबंधाच्या भाषणांत रमा व दिपेची भावजय या दोघी अगदीं रळी करून सोडीत, आणि आपल्या यजमानांच्या मागील कांहीं प्रसंगींच्या बहादुरीबद्दल पर्यायानेंच परंतु अत्यंत आदरभावपूर्वक व अभिमानपुरस्सर गोष्टी

दिपेच्या भावजईच्या तोंडावाटे सहज आणि उमाप निघत त्या वेळीं तिचीही रमा व दिपा यांनीं थट्टा उडवावी. असा हा प्रेमकलह दासीजनांस वगैरे बराच करमणुकीचा झाला.

या सर्व कुलीन स्त्रीपुरुषांची एकाच वेळीं एकाच ठिकाणीं अशी गांठ सर्व जत्रेंत पडण्याचा योग शेवटच्या दिवशीं अगदीं अचानक आला. शिखरशिंगणापुरास या काळीं एक परमयोग्य शान्तलिंगबावा नांवाचा साधु पुरुष होता. याची सर्व प्रांतांत चांगली प्रख्याति असे. हा महाज्ञानी, आत्मनिष्ठ, हठयोग, राजयोग यांत प्रवीण असून मोठा शांत असा असे. जवळच देवगडास असलेले जनार्दनबावा श्री एकनाथांचे गुरु हेही आपल्या शिष्यासह या प्रसंगीं शिखरावर आले होते. इतरही देशोदेशींचे संत महंत पुष्कळ आले होते. सर्वांची बैठक शांतलिंग-बावांच्या मठांतच असे. हा मठ ह्मणजे एक विस्तीर्ण ओरी होय. तिच्या पुढल्या अंगास बरीच मोकळी फरशी होती, व दोन्ही अंगास दोन लहानलहान खोली-वजा मठ्या होत्या.

पूर्णिमेच्या दिवशीं ही सर्व मंडळी, मालोजी, विठूजी, धर्माजी, सर्जेराव आणि थोरले नाईक, धाकटे नाईक, दिपा, रमा वगैरे त्याचप्रमाणें लक्ष्मणभट्टही, तेथें जमले. तेथें ज्यानें त्यानें आपापल्या अधिकाराप्रमाणें साधुमूर्तींचें नमस्कारपूर्वक पुष्पहार, फळें, वस्त्रें, महादक्षणा वगैरेनीं पूजन केलें. स्वामींनींही त्या सर्वांस त्यांच्या त्यांच्या योग्य आशीर्वाद दिले व शेवटीं सर्वांस स्वधर्माचें वर्णाश्रम-पूर्वक पालन करण्याबद्दल उत्तम उपदेश केला. रमेवरील संकट मालोजीरावांनीं कसें धैर्यानें टाळिलें व शंभूचा व

तिचा जीव कसा बचावला ही गोष्टही स्वामींच्या सहजगत्या कानावरून गेली. ती ऐकून मालोजीरावाची त्यांनीं चांगलीच तारीफ केली व त्यास पुष्कळ गौरविलें. जनार्दनस्वामींनींही मालोजीची सर्व हकीकत लक्ष्मणभट्टांकडून ऐकून घेतली, आणि नाइकांशीं चाललेल्या सुखदु:खाच्या गोष्टींत सहजगत्या दिपेच्या लग्नाचीही गोष्ट निघतांच त्यांनींही नाइकांस लक्ष्मणभट्टांच्या पसंतीनेंच नाइकांनीं दिपेचा वरनिश्चय करावा अशी आपली मनीषा दर्शविली. सर्जेराव महाडीक यांची मूलपीठिकाही तेथें निघाली व जमल्यास त्यांची व रमेची सोयरीकही वाईट नाहीं, असेंही लक्ष्मणभट्ट मालोजी व त्रिवर्ग साधुमूर्ति यांच्या मनानें ठरलें. असो; शेवटीं मालोजीरावानें सर्व मंडळी गेल्यावर स्वामींस अनन्यशरण जाऊन त्यांची कृपा संपादन केली व 'आपणास उपदेश द्यावा' ह्मणून विनंती केली. स्वामींनी त्याला दुसरे दिवशीं उपदेश देण्याचें वचन दिलें; व त्याप्रमाणें दुसरे दिवशीं पहांटे 'शिवपंचाक्षरी' मंत्रदानपूर्वक

**'स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः'**

असा श्रीमद्भगवद्गीतोक्ततत्त्वाचा उपदेश केला.

लक्ष्मणभट्टांचे परिश्रम, शांतालिंगबावांची संमति, मालोजीरावाची मर्दुमकी आणि दिपेचा व मालोजीरावाचा या जत्रेच्या निमित्तानें एकमेकांस आलेला अनुकूल अनुभव व तज्जन्य अन्योन्य प्रेमभाव या सर्व गोष्टींचा परिणाम इतर सर्व अडचणींस न जुमानतां इष्ट तोच होण्याचीं स्पष्ट चिन्हें लवकरच दिसूं लागलीं.

---

## प्रकरण ११ वें.

सज्जनसमागम सदा सर्वांस सफलदायकच होतो. सत्य-संकल्पाचा दाता ईश्वर सद्धेतुपूर्वक केलेले स्वदाससंकल्प सिद्धीस नेण्यास सदा सिद्ध असतो. दिपा व मालोजीच्या विवाहासंबंधाची अशीच स्थिति होती. त्यांचें परस्परांचें परस्परांवर प्रबल प्रेम होतें. पंडित लक्ष्मणभट्टांसारखा पुरुष त्यांचा शरीरसंबंध घडवून आणण्यास झटत होता. मग काय? तशी गोष्ट होणें अशक्य थोडेंच होतें? अशक्य नव्हतें खरें; तथापि एक पक्ष जहागिरदार—राजा ह्मटलें तरी चालेल—आणि दुसरा पक्ष ह्मणजे मालोजीचा अगदींच गरीब, नांवाचे मात्र राजे पण खरे केवळ पाटिलबुवा, आणि हा फरक या लग्नाच्या बाबतींत तर प्रथमच ब्रिब्बा घालणारा. बाकी अडचणी ह्या केवळ सुखाची किंमत वाढविणाऱ्या होत. ईश्वराचा हेतु मनुष्यास अडच-णींत घालण्यांत नेहमीं मनुष्याचें कल्याण करण्याचाच असतो, आणि तसेंच येथेंही घडून आलें. ह्या सर्व अड-चणी आल्या तशा गेल्याही. मात्र त्याचा परिणाम या दोघांहा वधूवरांची परस्परप्रीति कायम करण्यास व वाढविण्यास कारण होऊन विवाह झाल्यावर त्यांच्या सुखांत त्यानें भरच पडली. लक्ष्मणभट्टांच्या खटपटीस यश येऊन अखेर वैशाख शुद्ध द्वितीयेस लग्न ठरलें.

पाटलीणबाईसही या गोष्टीचा फार आनंद झाला. तथापि व्याह्यांबरोबर खर्चास टक्कर देण्यास आपली ताकद नाहीं. ह्या गोष्टीचें तिला जरा वाईट वाटलें. ती उणीव पुंडेनाइकांनीं मोठ्या हौसेनें भरून काढली. त्यांनीं पाट-

लीणबाईस पांचहजार रुपये हातउसने देऊं केले. पैकीं १००० रुपये आहेर आणि ५०० रुपये गडगनेर मिळून पंधराशें रुपये केवळ बक्षीस समजून, उरलेले ३५०० रुपये मात्र सवड होईल तेव्हां फेडावे, त्याबद्दल आपला तगादा मुळींच नाहीं.' असेंही त्यानीं तेथल्यातेथेंच पाटलीणबाईस सांगितलें. मालोजीरावानें लक्ष्मणभट्टांकडून आपल्या भावी श्वशुरास तर स्पष्ट असें सुचविलें होतें कीं 'आपली मुलगी जर या ठिकाणीं देणें असेल तर त्यांची करण्यास कांहीं हरकत नाहीं; परंतु खर्चाच्या संबंधानें सर्व हौशी आपल्या आपण वाटेल तितक्या करून घ्याव्या. वरपक्षाकडून त्या बाबतींत कांहींएक होणार नाहीं.' दिपेचें सांगणें, अर्थात् योग्य मार्गानें व मर्यादेनें, कीं आपणास मालोजीरावच वर पसंत आहे ह्मणून, आणि लक्ष्मणभट्टांस दिलेलें वचन या दोन गोष्टींनीं निंबाळकर नाइकांस तर हें लग्न मोडतांच येत नव्हतें. त्यांनीं सर्व अटी मुलीच्या वयाकडे नजर देऊन व काळाकडे पाहून निमूटपणें कबूल केल्या. ह्या सर्व गोष्टींचा परिणाम असा झाला कीं आपण होऊनच नाइकांनीं दोहोंकडच्या सामानसुमानाची कडेकोट तयारी केली आणि लग्न मोठ्या थाटांत पण सुखासमाधा-नांत, पाटलीणबाईस विशेष खर्च करावा न लागतां पार पाडिलें. नाइकांनीं जांवयास उंची पोषाख, उत्तम तरवार, पाणजांवयास सुद्धां बसावयास खंदे घोडे सरसामानासकट देऊन संतुष्ट केलें.

हें लग्न झाल्यावर लगेच दुसऱ्या वर्षीं विठूजीचेंही लग्न झालें. विठूजीच्या लग्नास तर पाटलीणबाईस मुळींच श्रम पडले नाहींत. दोघीही सुना सुस्वभावी, सासूची सेवा

करणाऱ्या, घरांत बहिणीप्रमाणें वागणाऱ्या, कष्टाळू अशा निवटल्या. दोघीही जाणत्या व सुग्रण असून संसारांत दक्ष असल्यामुळें पाटलीणबाईस अत्यंत समाधान झालें. त्यांनीं आपलें मन हळुहळु संसारांतून काढून जाणून-बुजूनच देवधर्माकडे लावलें. त्या आतां पंढरीच्या वार्षिक वारीस जाऊं लागल्या. कधीं तुळजापूर तर कधीं शिखरशिंगणापूर, याप्रमाणें कोठें ना कोठें तरी पवित्र देवस्थानीं अथवा गाणगापूर, पंढरपूर वगैरे सारख्या क्षेत्रीं वास करण्यांत त्या आपला कालक्षेप करूं लागल्या. आतां फक्त नातू पाहण्याची त्यांना आशा राहिली होती. बाकी या जगींची त्यांची कांहीं एक इच्छा नव्हती. लक्ष्मणभट्टांचा मुलगा लग्नाचा होता, आणि तोही भार अर्थात् पाटलीण-बाईवरच होता. ईश्वराच्या दयेनें तेंही कार्य विशेष त्रासा-वांचून पार पडलें, आणि लक्ष्मणभट्ट फिरून एकदां उदे-पुराकडे आपल्या यजमानाकरितां चालते झाले. दरम्यान रमाबाईचें व सर्जेराव महाडिक यांचेंही लग्न ठरून मालो-जीनें तें कार्य स्वतः अंगावर घेऊन मोठ्या हिंमतीनें पार पाडिलें. ह्या कामांत विठूजीची व त्यांची थोडी बाचाबाच झाली, तथापि ती लवकरच मिटलीही. शंभू—रमेचा भाऊ—मालोजीरावाबरोबर घरांतीलच एखाद्या माणसाप्रमाणें राहत असे. तोही आतां चांगला १६ वर्षांचा झाला होता. त्याला निंबाळकरांकडे शिबंदीस्वारांत नाइकाची जागा देववून मालोजीरावानें त्याची सुव्यवस्था केली. सर्जेराव महाडीक हा एक कुलीन मराठा असून त्याचें वतनी गांवही जवळच होतें. तो घरचा एकटा होता. उत्पन्न बेताबाताचेंच असे. तथापि त्यानें अलीकडे नुकतीच दौलताबादकरांकडे स्वारांत

नोकरी मिळविली होती. याप्रमाणें या पांचचार वर्षांत बऱ्याच गोष्टी घडून आल्या होत्या.

तथापि मालोजीचा मुलगा पाहण्याची पाटलीणबाईची हौस पुरी झाली नव्हती. विठूजीला मात्र नुकताच एक मुलगा झाला. त्यामुळें या नाहीं त्या मुलाचा परंतु नातू पाहण्यास पाटलीणबाईस मिळाला. दिपाबाई आपल्या पुतण्यावर प्रत्यक्ष पोटच्या मुलासारखी माया करीत असे. तिच्याजवळ आपपर हा भेदच नव्हता. मालोजीचीही तीच तऱ्हा. एकंदरींत दिपा आणि मालोजी हीं दोघेंही उत्तरोत्तर एकमेकांस जास्तजास्तच प्रिय होत गेलीं. त्यांच्या वयाबरोबर त्यांचें प्रेम सारखें वाढतच होतें. इतर सामान्य लोकांत तें पुष्कळ प्रसंगीं कमी होतें. नवऱ्याच्या जिवास जपणें आणि त्याच्या मनाला संतोष देणें यावांचून दुसरी कोणतीही गोष्ट दिपेला प्रिय नव्हती. तिचे लहानपणचे आवडते खेळ, घोड्यावर बसण्याची हौस वगैरे हीं सर्व पतीच्या शुश्रूषेंत लीन होऊन अगदीं एकरूप झालीं. त्याचा आनंद तो तिचा आनंद, त्याचें सुख तें तिचें सुख, त्याला दुःख तेंच तिचें दुःख, त्याचें मन तेंच तिचें मन आणि त्याचे प्राण तेच तिचे प्राण अशी ती सर्वस्वी पतिपरायण झाली. शरीरें मात्र दोन, तेथें तिचा इलाज नव्हता. नाहीं तर तींसुद्धां एक बनविण्याचा जर कांहीं उपाय तिच्या स्वाधीन असता तर तिनें तो करून तशीही गोष्ट घडवून आणण्यास कमी केलें नसतें. अशा प्रकारें दिपाबाईची ही वृत्ती पाहून तिच्या सासूला किती आनंद आणि कोण धन्यता वाटली ह्मणून लिहावें! सासूची शुश्रूषा आपल्या हातून सतत घडावी अशी दिपेला

फार इच्छा. पण ही सासूही उगाच सुनेला आपल्या कामाखालीं झिजूं देणारी नसून उलट सुनेचेंच काम आपण हलकें करणारी होती. मालोजीही आपल्या धर्मपत्नीला यत्किंचितही दुःख होऊं नये ह्मणून जपत असे. उगाच तिरशिंगरावी करून नवरेपणाचा तोरा त्यानें तिला कधींही दाखविला नाहीं. त्याला तिच्या आवडीनिवडी सर्व चांगल्या माहीत असून संमत होत्या. इतकेंच नव्हे तर लग्नापूर्वी कधीं गोष्टी निघाल्या ह्मणजे तो जशा स्वभावाची आणि गुणांची बायको आपल्याला मिळावी ह्मणून ह्मणत असे, तशाच गुणांची आणि स्वभावाची स्त्री आपणांस ईश्वराचे कृपेनें मिळाली ह्मणून तो त्याचे आभार मानून आपणास धन्य ह्मणवीत असे. या संसारांत उत्तम भार्या मिळणें ह्मणजे खरोखरच ईश्वराचा अनुग्रह व पूर्वसुकृतच हवें. तात्पर्य, पाटलीणबाईचें कुटुंब या वेळेस अगदीं आनंदांत होतें. त्यांत उणीव कायती मालोजीस एखादें पोरबाळ लवकर व्हावयाला पाहिजे होतें. पाटलीणबाईप्रमाणेंच दिपेच्याही वृद्ध मातापितरांची फार आशा होती, आणि त्याकरितां दोन्ही बाजूंनीं नवससायास यथास्थित चालले होते. कारण, ह्या गोष्टी मनुष्याच्या हातच्या थोड्याच आहेत. तीं सर्व सूत्रें त्या ब्रह्मांडचालकाच्या हातांत असतात. त्याच्या लहरीप्रमाणें आणि संकेतानुरूप तीं चालविलीं जातात.

सदा सर्वकाळ निर्भेळ सुख असें कोणालाच मिळावयाचें नाहीं असा सृष्टीचा एक नियम दिसतो, आणि तो तसा आहे ह्मणूनच बरें आहे, नाहीं तर ईश्वराची वास्तपुस्त कोणी कधीं केलीच नसती. अंधारानें उजेडाची, दारिद्र्यानें श्रीमंतीची,

दुःखानें सुखाची, गरजेनें अनुकूलतेची, याप्रमाणें वाईटानें चांगल्याची जगांत नेहमीं किंमत होत असते, आणि ह्मणूनच सद्गुणाचा मान, दुर्गुणाचा तिरस्कार, न्यायाची बडेजाव, अन्यायाची निंदा, धर्म, अधर्म, चाल, गैरचाल इत्यादि गोष्टींची वाटाघाट आणि पर्वा लोक करितात. या जगांत जीं संकटें अथवा बरेवाईट प्रसंग मनुष्यावर येतात ते केवळ त्याच्या हिताकरितांच येत असतात. त्यांच्या येण्यानें त्याला चांगलें व वाईट यांतील तारतम्य कळतें आणि तो सन्मार्गाला लागतो. निदान तो तसा सन्मार्गाला लागावा, अशी तीं संकटें त्याच्यावर लादण्यांत त्या दयावन परमेश्वराची उदार इच्छा असते. ह्मणून येणाऱ्या दुःखांपासून व संकटांपासून जर मनुष्यानें योग्य तो बोध घेतला तर त्याचें इहपरलोकीं हितच होतें; न घेतल्यास तो त्या संकटांचा व दुःखांचाच नेहमींचा दास बनून राहतो. या नियमाला अनुसरून मालोजीवरही लवकरच या संकटपरंपरांची धाड येण्याचीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं होतीं. त्याचा उत्कर्ष त्याच्या चुलत भाऊबंदांस सहन होईनासा झाला होता. त्यांना वाटे कीं वडील घराण्यांतला झाला ह्मणून काय झालें? सर्वच मुखत्यारी आणि मानमरातब यालाच काय ह्मणून मिळावा? स्वतंत्र कर्तृत्वहीन पुरुषांना भाऊबंदकीसारखी दुसरी कोणतीच गोष्ट या जगांत हितावह वाटत नाहीं. त्यांची जी काय सर्व सुख देणारी कामधेनू ती ही भाऊबंदकी. ही राक्षसी तर सुख, शांति आणि सद्गुण यांच्या मुळावरच. हिचें आणि उत्कर्षाचें उभें वैर. हिनें आजपर्यंत कित्येक सार्वभौम राज्यें धुळीस मिळविलीं आहेत, मग सामान्य जनांची ती काय कथा?

मालोजीचा स्वभाव उदार, न्यायी, निर्लोभी आणि क्षमाशील असल्यामुळें त्याच्या भाऊबंदांस त्याच्याशीं भांडण उकरून काढण्यास कांहीं जोरदार खुसपट सांपडेना, तेथें त्यांचा कांहीं इलाज चालेना. आपल्या भाऊबंदांच्या मनांत आपल्याबद्दल मत्सर अथवा द्वेष आहे अशी मालोजीला कित्येक दिवस शंकाही आली नाहीं. पुढें जेव्हां त्याला त्यांच्या मनांत आपल्याबद्दल द्वेषभाव आहे असें कळलें, तेव्हां प्रथम त्याला फार वाईट वाटलें, थोडासा रागही आला, परंतु लगेच त्यानें पोक्त विचार करून जिकडून त्या आकाबाई भाऊबंदकीची झडप आपल्यावर न येईल अशा रीतीनें वागण्याचा निश्चय केला. कुळें त्याजवर नेहमीं खुष असल्यामुळें आणि गल्ला वगैरेच्या वांटण्या खळ्यावरच्या खळ्यावर अगदीं उघडया व धारवाडी कांट्यानें करण्याचा त्याचा नेहमींचाच चोख कित्ता असल्यामुळें, त्या बाईचें त्याच्यापुढें कांहीं एक तंत्र चालेना. तेव्हां अर्थात् तिच्या भक्तांत जास्त कृष्णकारस्थानांस प्रारंभ झाला. 'कर नाहीं त्याला डर कशाला?' असें ह्मणून मालोजी तिकडे मुळींच लक्ष देत नसे. तथापि त्यांनीं असा उच्छाद मांडला कीं, शेवटीं आपल्याला या गावांत राहणें नको असें मालोजीला वाटूं लागलें. आधींच त्याला ही भिकार नांगरबहाद्दुरी मनापासून नको होती. त्यांतही हा असा रोज नवा त्रास आणि कटकट तिच्यापासून होऊं लागतांच त्यानें तिला रामराम ठोकण्याचाच बहुतेक विचार मुक्रर केला. विठूजीला कुळंबाव्याची मनापासून हौस होती. तरी मालोजीच्या विरुद्ध वर्तन करण्याची किंवा त्याच्या पश्चात् शेतीची सुव्यवस्था आपला बोज राखून ठेवण्याची त्याच्यांत धमक

नव्हती. तेव्हां जिकडे मालोजी तिकडे त्यालाही जाणें भाग होतें. मालोजीरावानें आपलें सर्व कुटुंब देउळगांवाहून कायमचें हालवून वेरुळास नेण्याचें ठरविलें, आणि आपण हरप्रयत्नानें लष्करी नोकरी मिळवावयाची असा त्याचा संकल्प ठरला.



## प्रकरण १२ वें.

डंबरघांट ओलांडण्यांत जो शीण होतो तो शंभर डोंगर-घांट ओलांडण्यांतही होत नाहीं. पुढच्या कल्याणाच्या आशेनें कां होईना, स्वजन्मभूमी सोडण्याचें मनुष्यास फारच जड पडतें. जेथें लहानपणचें आयुष्य घालविलेलें असतें व जेथील सृष्टिसौंदर्याच्या अवलोकनानें मनुष्यानें आपल्या मनास अनेक वेळां संतोषविलेलें असतें, तें सृष्टिसौंदर्य कायमचें सोडून देऊन दुसऱ्या अगदीं अपरिचित स्थलीं जाणें मनु-ष्याच्या जिवावर येतें. देउळगांव सोडून वेरुळास जातांनां मालोजीची काय स्थिति झाली याची वाचकांनींच कल्पना करावी हें बरें. त्याचे डोळे दु:खाश्रूंनीं भरून आले; कंठ दाटून आला आणि त्याचे पाय चालण्याचें नाकारूं लागले. विठू-जीची दृष्टि आपल्या शेतजमीनीवरून कांहीं केल्या हालेनाच. शेवटीं गाड्या बऱ्याच पुढें गेल्या तरी 'अजून पाटिलबोवा कां येत नाहींत? पाहून तरी यावें, ह्मणून धर्माजी मागें परतला, व पाहतो तों हे दोघेही गांवच्या शिवेवरच. यांस पाहतांच, 'अन् अजून इथंच काव करता जी? गाड्या तर कास दीड कास पुढं गेल्या असत्याल' असें धर्माजी मोठ्यानें ह्मणाला. तेव्हां 'हे आह्मी निघालोंच होतों. तूं परत कशाला

आलास?' ह्मणून मोठ्या कष्टानें मालोजी व विठूजी यांनीं आपला पाय काढला.

बैलगाडीचा प्रवास. मोंगलाई अम्मल. मग त्या दुःखाला काय विचारतां? शिवाय हे दिवस ऐन उन्हाळ्याचे असल्यानें दिवसाची चाल बहुतेक बंदच ह्मटलें तरी चालेल. सर्व प्रवास रात्रीं व्हावयाचा. दिवसा चारसहा घटका दिवसापासून संध्याकाळचा प्रहर दिवस उरेपर्यंत कोठें तरी मुक्काम केल्यावांचून गत्यंतरच नसे. फिरून रात्रीं दहाबारा घटका रात्र झाली कीं मुक्कामाचीच वेळ. हा मुक्काम पहांटेच्या प्रहर—दहाघटका रात्रीपर्यंत. सारांश काय, सबंध दिवसांत आठदहा कोसांची मजल झाली ह्मणजे अगदीं मिळविली. रस्ते जरी बरेच वाहते असत तरी मुक्कामाच्या जागीं प्रशस्त धर्मशाळा, विहिरी, तळीं अथवा टांकीं यांची असावी तशी व्यवस्था क्वचितच असे. शिवाय कोठें एखादी निवाऱ्याची धर्मशाळा असली तर त्याच वेळीं कोणी शेर अच्छेर खां तेथें उतरलेला किंवा उतरावयाचा नसल्यास ती देशी लोकांच्या वांटणीला यावयाची. नाहीं तर कांहीं सोय नाहीं. कैक प्रसंगीं धर्मशाळा अगदीं रिकामी ह्मणून तेथें बिनधास्त उतरावें, सामानसुमान लावावें व बायकामाणसांस ठेवून पाणी वगैरेच्या तजविजीकरितां पुरुषमाणसांनीं कोठें जावें, तों मागें कोणी तरी दाढीबहाद्दर यावे व 'चलो! उठाव ये सब यहांसे' असें ह्मणून त्यांनीं बायकामाणसांस अगदीं तोंडांत टाकावयालाच लागावें. त्यांतच जर का एखादी तरुण व सुंदर अशी निराधार स्त्री त्यांच्या तावडींत सांपडली तर मग काय? बहुतेक आलीच तिच्या पातिव्रत्यावर

कुऱ्हाड. बरें तसें नसून एखादा भित्रा पुरुषमाणूस ही असला, तर त्याच्याबरोर कांहीं तरी खुसपट काढून 'तुझी आतांच्या आतां मुसलमान व्हा' ह्मणूनसुद्धां त्याच्यावर त्या राज्यमदोन्मत्त खानसाहेबांचा जुलूम व्हावयाचा. अशा तऱ्हेचे प्रवासांत अनेक प्रसंग पडून कित्येक स्त्रीपुरुषांस व सबंध कुटुंबांस स्वधर्मत्याग करावा लागला आहे. अशा रीतीनें मुसलमान झालेल्या कुटुंबांचा विस्तार होऊन कित्येक लहानलहान खेडीं व वड्या त्यांच्या वस्तीनें भरल्या आहेत. शिवाय प्रवासांत लूटमारही केव्हां होईल आणि कोठें होईल याचा कांहीं सुमारच नव्हता. असला हा बिकट प्रवास पतकरण्याचा प्रसंग, केवळ भाऊबंदकीच्या तिरस्कारामुळें, मालोजीवर आला होता. ईशकृपेनें यांचे पहिले तीन मुक्काम सुरक्षितपणें पार पडले. चवथ्या दिवशीं या मंडळींनीं आपल्या गाड्या पहांटे प्रहररात्रीच्या सुमारास जोडावयाची तयारी केली होती; व मंडळी जरा स्वस्थ झोंपी गेली, तों सरासरी रात्र नुकतीच कलते आहे न कलते आहे अशा वेळीं जवळच्या वाडींतून मोठमोठ्यानें बोंबा ऐकूं येऊं लागल्या. गाडीवानांपैकीं ज्या दोन इसमांची पहाऱ्याकरितां जागें राहण्याची पाळी आली होती त्यांनीं ह्या बोंबा स्पष्ट ऐकिल्या; आणि ते आपल्या इतर सोबत्यांस जागें करूं लागले. इतक्यांत एक मराठा जवान सर्व शरीर रक्तबंबाळ झालेलें असा धांवतधांवत या गाड्यांच्या तळावर आला व या गाडीवानांस पाहून 'मर्दहो, या वेळीं माझें तुह्मी रक्षण करा' अशी त्यांची हातापायां पडून विनंती करूं लागला. तों इकडे ही चाहूल ऐकून मालोजीही खडबडून जागा झाला. त्याची झोंप फार सावध

असे. तो जागा होतांच लगेच गाडीवानांकडे गेला आणि काय प्रकार आहे, ह्मणून चौकशी करूं लागला. त्याला त्यांनीं सर्व हकीकत सांगितली आणि 'धनीसाब वकुत लइ वंगाळ दिसतुया' ह्मणून एक दुःखोद्गारही काढिला. मालोजीनें त्या आलेल्या इसमास धीर दिला आणि त्याच्या पाठलागांत असलेले मुसलमान अगदीं जवळ येऊन ठेपले असें पाहून त्यानें त्याला लपविण्याची तजवीज केली. इतकें होतें आहे तों चारपांच मुसलमान हातांत नागव्या तरवारी घेतलेले गाड्यांच्या तळावर येऊन धडकले आणि 'किधर है वो हरामजादा हैबत? अबी हमारे सामने वो इधर भाग आया, और ह्यां तो कुच दिखता नही.' असें ओरडूं लागले. मालोजीरावानें त्याला सामानाच्या गोटांत विठूजीच्या शेजारीं पांघरुणाखालीं गपचीप निजून राहण्यास सांगितलें होतें. रात्र अंधेरी होती, आणि हे आलेले मुसलमान आपल्याच धुंदींत असल्यामुळें त्यांच्यासमोरच वरील व्यवस्था झाली तरी त्यांस त्याची कांहीं दाद लागली नाहीं. विठूजीही इतक्या अवकाशांत जागा झाला. 'क्यंव बे गद्धे! किधर है वो हरामखोर मरगट्ठा? उस्कू अबीकेअबी हमारे ताबे कर देव; नही तो हम तुमकूबी काट डालेंगे.' याप्रमाणें ते मालोजीस व गाडीवानांस दरडावीत इकडेतिकडे धुंडूं लागले. मालोजीनें त्यांना चापून उत्तर दिलें कीं 'येथें कोणी हैबती वगैरे नाहीं. तुह्मीं येथें दांडगाई करूं नका. जर का तुह्मी उगाच धुमाकूळ माजवाल तर आपला विचार बघा.' परंतु ते का ऐकतात? आडदांड, बेमुरवत लोक ते, लगेच शिवी-गाळी करून ते एकदम हातघाईवर आले. मालोजीनें

हे लोक तोंडच्या दरडावण्यास भीक घालीत नाहींत व त्यांस खून चढलेला आहे असें पाहून व प्रसंगाकडे नजर देऊन पड घेतली; आणि तो त्यांस चार सामोपचाराच्या व विनवणीच्या गोष्टी सांगूं लागला. 'मियासाब जरा ठेरो तो सही. तुम देखो हमलोग तो वाटसरू है. हमकू नाहक सतानेमें तुमकूं क्या फायदा? खालीपिली गरीब आदमीकूं सताना ये तुमारे जैसे शेरकू मुनासिब नही. तुह्मारी खुषी हो तो हम तुमकू सब कुच दिखलायेंगे. लेकिन जरा सबुर करो. व्हां हमारे छोटे बालबच्चे और औरता सो गये है. बस्स उस् जगे सिवाय किधर बी तुमारा आदमी जो तुमकू देखनेका होवे तो देख लेव.' याप्रमाणें बोलतबोलत वुलवीत वुलवीत त्यानें त्यांस बरेंच दूर नेलें; आणि बिनहत्यारी हुजत या लोकांशीं फार वेळ टिकणार नाहीं असें जाणून त्यानें रामजीधर्माजींस हत्यारें काढून आणण्यास खूण केली. त्याप्रमाणें त्यांनीं तेवढी तजवीज त्या मुसलमानांच्या मनांत कांहीं एक संशय येऊं न देतां केली. त्याचप्रमाणें विठूजीलाही योग्य ती इशारत पोंचवून सामानाच्या व बायकामाणसांच्या रक्षणार्थ त्याला तयार करून ठेविलें. मालोजी व ते मुसलमान इकडेतिकडे बरेंच फिरल्यावर फिरून ते खांसाहेब आपला इसम कोठें दिसत नाहीं असें पाहून बिथरले; आणि यांनीं 'बस्स तुमनेही उस्कू छुपा दिया है. तुम हमकू ठगाते हो, तुम बडे बदमाष हो' अशी एक आणि दोन सतरा प्रकारांनीं कुचाळी काढण्यास व शिवीगाळ करून मारामारी करण्याचा त्यांनीं घाट घातला. मालोजीच्या हातांत या वेळीं त्याची गुप्ती

आली होती. त्यानेंही आतां त्यांचा कांहीं एक मुलाजा न धरतां जशास तशा भाषेनें संभावना करण्याची सुरवात केली.

इतक्यांत बायकामुलें वगैरे सर्व तळ जागा झाला; आणि त्यांची आपापसांत कुजबूज सुरू झाली. तों वाडीच्या बाजूनें 'पकडो! चली भाग चली! मत जानेदेव! —धांवा हो धांवा कोणी तरी. या गरीब दीन गाईला या मेल्या मांगांच्या हातून सोडवाहो? देवा मरतें आतां! आई धरणीमाते! मला आपल्या पोटांत तरी दुभंग होऊन जागा दे. धरा! हाणा! ठोका बघतां काय?' अशा प्रकरचा मराठे, मुसलमान, बायका, पुरुष वगैरे सर्वांचा एकच गिल्ला ऐकूं येऊं लागला. तेव्हां तर या गाडीतळावरील बायकापोरांची व कांहीं शेंदाडशिपाई पुरुषांची अगदीं पांचावर धारण बसली. मालोजी, धर्मोजी, रामजी, विठूजी वगैरेनांही प्रसंग फारच बिकट येऊन ठेपला असें वाटून त्यांनीं एकदम 'जय आईमाते तुळजाभवानी! जय शंभुमहादेव! आतां या प्रसंगांतून निभावून नेणें हें तुह्मांकडेच आहे,' असा उद्गार काढला; आणि प्रत्येकानें आपापलें हत्यार सांवरलें. त्या मुसलमानांनींही तो तिकडचा गिल्ला ऐकतांच जरा कावरीबावरी मुद्रा करून आपला मोर्चा एक क्षणभर तिकडे फिरविला, परंतु लगेच मालोजीकडे वळून 'क्यंव बे हरामखोर? तुम हमारा आदमी ताब्रे करते हो जलदी क्या नही? बोल.' असा जोराचा प्रश्न खूप चवताळून त्यांनीं त्यास केला. 'लेव जो तुमकू मिलेगा तो. हमकूं नही मालुम. हम नही कुच जानते कौनसा तुमारा आदमी और वो कहां भाग गया? लेकिन

याद रखना जो हमारे बालबच्चे और औरतलोगोंके बाल-कूबी धक्का लग जावे तो.' याप्रमाणें मालोजीकडून ही सवाई सणसणीत जबाब त्यांना मिळाला. त्यासरसे त्यांपैकीं दोन इसम चवताळून यांच्या अंगावर धांवले; व आतां वार करणार तोंच मालोजीनें एकास व धर्माजीनें एकास याप्रमाणें जमीनीवर आपल्या गुप्त्यांच्या वारांनीं खालीं पाडिलें व त्यांच्या तरवारी काढून घेतल्या. हें पाहतांच उरलेले दोघे तेथून पळ काढण्याच्या विचारास लागले. तोंच पुढें एक तरुण ब्राह्मणस्त्री व तिच्या पाठोपाठ दहापांच हातांवर एक जवान मुसलमान आरब असे येतांना त्यांच्या दृष्टीस पडले. त्या आरबाची व त्यांची दृष्टादृष्ट होतांच त्यानें एकदम 'देखो चली! अस्मानकी परी उड गयी! पकडो उधरसे उस्कू' अशी आरोळी ठोकिली. त्यासरसें मालोजी वगैरेंचेंही लक्ष त्या बाईकडे गेलें, व तिला अडविण्यास पुढें सरसावलेल्या मुसलमानांच्या व तिच्या दरम्यान मालोजी झाला. तेव्हां दोघेही मुसलमान त्याच्यावर नंग्या तरवारीनिशी एखाद्या चिडलेल्या चित्त्याप्रमाणें धांवले. झाली लगेच तरवारींची खणाखणी सुरू! मालोजीची गुप्ती अशी गरगर फिरत होती कीं पाहणाराचा तिजवर डोळाही ठरत नव्हता. तो तिसरा जवान आरबही याच हातघाईंत येऊन मिसळला व या दोघातिघांची एक अर्धघटका अगदीं अशी ठरून राहिली कीं कांहीं बोलायची सोयच नाहीं.

आपल्या धन्यावरील प्रसंग पाहून सर्व गाडीवानांस अत्यंत वाईट वाटलें. शिवाय बायकामाणसांत तर अगदीं हलकल्लोळ उडून राहिला. दिपेचा त्वेष तर इतका

अनावर झाला कीं, सासूच्या शब्दाबाहेर स्वप्नांतही न जाणारी ती, या वेळेस पाटलीणबाई शपथ घालून नको-नको ह्मणत असतांही, चिडलेल्या पटई ( वाघिणी ) प्रमाणें आपल्या पतीच्या मदतीकारितां धांवली, परंतु मालोजीनें 'असलें साहस करूं नकोस. मी या सर्वांचा समाचार घेतों. निष्काळजी ऐस. मात्र या शरण आलेल्या बाईस आपल्या तिकडे घेऊन जा आणि तिचें सांत्वन कर' असें सांगतांच "नका हो! मला येऊंच द्या. मी तुमच्या सुखाची तशी तुमच्या दुःखाचीही धर्मपत्नी या नात्यानेंच वांटेकरी नाहीं का होत? बघा तर खरें! मी कशी त्या मेल्यांची खोडकी जिरवितें ती" अशी ती त्याची उलट विनवणी करूं लागली, परंतु शेवटीं "माझी आज्ञा तुला मानायची कीं नाहीं? चल, जा मागें मुकाट्यानें." असें जेव्हां मालोजीनें अगदीं निकरावर येऊन सांगितलें, तेव्हा ती त्या मुसलमानांच्या पाठलागांतून सुटलेल्या अनाथ बाईस घेऊन आपल्या सासूकडे परत गेली.

या सर्व प्रकाराचा परिणाम असा झाला कीं त्या गाडीवान वगैरे लोकांस अत्यंत त्वेष चढून ते सर्व, आपल्या जें हातीं लागेल तें, कोणी बैलांच्या जुंपण्या, कोणी कासरे, तर कोणी मोठमोठे धोंडे याप्रमाणें घेऊन, हरतऱ्हेनें त्या मुसलमानांचा समाचार घेण्याच्या तयारीस लागले. मालोजी, रामजी, व धर्माजी यांच्या लोकोत्तर चपळाई-पुढें आधींच ते मुसलमान अगदीं थिजून गेले होते, आणि त्यांचे हात लटके पडण्याच्या बेतांत आले होते. तात्पर्य काय कीं थोडक्याच वेळांत ते तीनचारही मुसलमान चतुर्भुज झाले आणि ही एक लहानशी लढाई संपली.

इतकें होतें आहे तों कोंबडा आरवला आणि त्या दिवशीं कृष्ण द्वादशी असल्यामुळें त्याच वेळीं चंद्रोदयही झाला. तिकडे त्या वाडींतील लोकांनीं चांगला जमाव बांधून राहिल्यासाहिल्या मुसलमानांस पार शिवपलीकडे हांकून लाविलें; व ते आतां परतून आपल्या घरादाराकडे चालले होते. त्यांना अजून या गाडीतळावरील कांहींच धामधूम माहीत नव्हती. ज्या बाईच्या रक्षणासाठीं त्यांना या याता-यातींत पडावें लागलें होतें, ती बाई कोठें आहे वगैरेचाही त्यांना कांहीं पत्ता नव्हता, त्यामुळें ते बहुतेक निरुत्साहच झाले होते. गाडीतळावरून मालोजीनेंही एकदोन इसम वाडींतील खबर काढण्यास पाठविले होते. त्यांची व यांची गांठ पडून त्या वाडींतील कांहीं लोक व मालोजीकडील गेलेले दोघे इसम असे फिरून गाडीतळावर आले. सर्व मंडळी जमल्यावर एकंदर चौकशी करितां असें कळलें कीं, ज्या ब्राह्मणस्त्रीच्या पातिव्रत्यावर हा हल्ला होता ती एका पुजाऱ्याची बायको होती. त्या वाडींत एक लक्ष्मीनारायणाचें फारच जुनें देवालय होतें. तेथील देवांच्या मूर्ती फारच सुंदर होत्या. रामभट या नांवाचा एक सत्वस्थ ब्राह्मण त्यांची भक्तिभावानें पूजा करून त्या देवालयांत राहत असे. त्याला येथें राहून आज चार वर्षें झालीं होतीं. भोंवतालच्या खेड्यापाड्यांतील लोक ह्या ब्राह्मणास परमपूज्य मानून यथाशक्ति जो तो त्यास कांहीं तरी पोंचवीत असे. त्यामुळें येवढ्याशा अवकाशांत देवाच्या अंगावर बरेच दागिने होऊन व चांगलीं चांगलीं उंचीं वस्त्रें मिळून चांगला दोनतीन हजारांचा विषय झाला. त्याची बायको सीताबाई ही परम साध्वी असून अजून पंचविशीच्या आंत होती.

ती अत्यंत रूपवती असे. तेव्हां तिचें हरण करून त्या देवमूर्तीचाही भंग करावा व देवळाची लूट करावी अशा उद्देशानें हा हल्ला झाला होता. कनककांताहरणासह आपल्या मूर्तिभंजक धर्माची वृद्धी करावयाचा मुसलमानांचा हा क्रम याप्रमाणें सर्व हिंदूंस त्या काळीं नेहमीं धूमकेतूप्रमाणें जाचक होत असे. प्रथम घायाळ होऊन आलेला मनुष्य त्या पुजाऱ्याच्या घरीं देवब्राह्मणाची सेवा करून राहणारा असा एक मराठा होता. याची ही अशी वृत्ति बनण्यास कारण त्याच्या सर्व कुटुंबाचें अशाच एक मुसलमानांच्या हल्लयांत वाटोळें झालें होतें. त्यानें त्या वेळींही आपल्या मर्दुमकीनें दहापांच शिखानष्टांस जन्माची आठवण राहण्यासारखा मार दिला होता, व आतां या प्रसंगींही त्याच्याच कर्तबगारीनें सीताबाईस त्या वावांच्या हातांतून प्रथम सुटतां आलें होतें, परंतु दुर्दैवानें अंधारामुळें व धांदलींत दोघांची चुकामूक होऊन फिरून ती त्यांच्यापैकीं एकाच्या कचाट्यांत सांपडून तिला गाडीतळाची वाट धरावी लागली. मालोजीनें ही इतकी हकीकत कळल्यावर रामभटाची काय वाट झाली, त्याच्या शोधार्थ मंडळी धाडली. तों रामभट गाभाऱ्यांत घायाळ व बेशुद्ध असे देवाच्या पायांवर पडलेले आढळून आले. मालोजीनें तळावरील गाड्या देवळाकडे आणण्यास सांगून आपण सर्व मंडळीसकट देवळाचा रस्ता सुधारला. तेथें गेल्यावर रामभटजींच्या व हैबतरावाच्या वगैरे जखमा बांधवून त्यांच्या औषधोपचाराची त्या ठिकाणीं होण्यासारखी ती सर्व व्यवस्था मालोजीनें लावली.

सर्व प्रकार कळल्यावर तेथील लोकांस फार आश्चर्य वाटलें. त्या सर्वांनीं मालोजीरावाचें फार गौरव केलें. नंतर 'हीं सर्व संकटें देवानेंच निवारिलीं, आपल्या माणसांच्या हातून काय होणार आहे' असें ह्मणून मालोजीनें सातआठ दिवस भटजी बरे होईपर्यंत तेथेंच मुक्काम करून देवांची फिरून अर्चा वगैरे करविली आणि सर्व वाडींतील लोकांसह एक दिवस देवाचा प्रसाद मोठ्या आनंदोत्साहानें घेऊन, परमसाध्वी सीताबाई व वेदोनारायण रामभटजी यांचे अनेक आशीर्वाद, त्याचप्रमाणें हैबतीप्रभृति इतर सर्व लोकांचा दुवा व धन्योद्गार संपादन करून फिरून सुमुहूर्तावर त्यानें तेथून प्रयाण केलें. हैबतराव अजून चांगला बरा झाला नव्हता. तथापि सीताबाई व रामभटजी यांनीं 'आपण खुशाल जावें. आह्मी त्याच्या औषधपाण्याची उत्तम तजवीज ठेवतों' असें आश्वासन दिल्यामुळें व मुलांमाणसांसहित प्रवासांत जास्त दिवस कंठणें गैर असल्यामुळें मालोजीचें तेथून जाणें झालें. नाहीं तर त्याचा पाय कांहीं तेथून निघत नव्हता. कारण हैबतरावाची जी थोडी फार हकीकत त्याला त्याच्या तोंडून एकावयास मिळाली होती, तीवरून रमा व शंभू यांचा कांहीं संबंध त्याच्याशीं पोंचत असावा अशी त्याला जबरदस्त शंका होती, ह्मणून तो खुलासा व्हावा अशी मालोजीची फार उत्कंठा होती, परंतु जास्त चौकशी करण्यासारखी हैबतरावांची प्रकृती सुधारली नव्हती. यानंतर मार्गांत फिरून कांहीं एक विघ्न न येतां तो सुखरूप आपल्या इच्छित स्थळीं जाऊन पोंचला.

---

## प्रकरण १३ वें.

मृगसराईचे दिवस होते. रात्रीची वेळ असून कृष्ण द्वादशी असल्यामुळें जिकडे तिकडे अगदीं अंधार झाला होता. त्यांत आभाळ गर्द आलें असून विजा चमकत होत्या. मधून गडगडाटही चालला होता. अशा समयास एक घोडेस्वार भिमथडी प्रांतांतून चालला होता. त्यानें आपला घोडा भरधांव सोडला होता. तथापि मधूनमधून त्याचा घोडा विजेनें व गडगडाटानें चमकत असे. त्यामुळें बराच व्यत्यय होत असे. पाऊस तर अगदीं डोक्यावर कोसळणार अशी वेळ येऊन ठेपली. तों त्या घोडस्वारानें घोड्यास टांच दिली. उद्देश काय कीं पाऊस कोसळण्याच्या अगोदर कोठें तरी निवाऱ्याच्या जागेवर जाऊन मुक्काम करावा. परंतु तें त्याच्या स्वाधीनचें थोडेंच होतें! तो लगबगीनें आपल्याकडून होईल तितका त्या अंधारांतच अंदाज बांधून एका गर्द झाडीकडे वळला. त्या झाडींत एक वाडी असावी असें त्याला वाटत होतें. तथापि त्याची खात्री नव्हती. शेंदोनशें कदम पुढें गेला नाहीं तों पाऊस सुरू झाला. सों-सों सों करून एकएक टिपका बोराएवढा येऊं लागला. त्याबरोबर–मुसळ धारीचाच पाऊस तो–स्वाराचे सर्व कपडे भिजून गेले. घोड्याच्यानें पुढें पाऊल टाकवेना. घोडा व स्वार गारठून जागच्या जागींच त्यांची गठडी वळण्याची वेळ येऊन ठेपली. पाऊस पण असा चापीत सुटला कीं, यादच राहावी! शेवटीं नाइलाज होऊन घोडेस्वार एका वडाच्या झाडाखालीं उतरला. हा वड बराच मोठा असून

त्याच्या पारंब्यांच्या मांडवाखालीं चारी बाजूला मिळून वीस-पंचवीस माणसें खुशाल राहतील अशी जागा होती. दोन-तीन ठिकाणीं तर पारंब्या इतक्या गर्द आणि मोठ्या झाल्या होत्या कीं त्यांच्या व झाडाच्या मुख्य खोडामधील जागा ह्मणजे केवळ खोल्याच बनल्या होत्या. आपल्या स्वारानें त्यांपैकींच एका खोलीचा आश्रय केला आणि आपला घोडा तेथेंच एका पारंबीच्या खोडाला बांधून ठेवला. पाऊस आतां थांबेल मग थांबेल ह्मणून वाट पाहतां पाहतां अगदीं पहांटचा सुमार झाला तरी पाऊस खळेना. इतक्यांत जोराचा वारा सुटला. तें पाहतांच आमच्या स्वारास जरा धीर आला. त्याला वाटलें कीं आतां हा वारा बहुतकरून पाऊस नाहींसा करील, आणि तसें पुढें कांहीं वेळानें झालेंही. परंतु दरम्यान हा वारा इतका जोरानें वाहूं लागला कीं, वृक्षांचे वृक्ष उन्मळून पडूं लागले. आपला घोडेस्वार ज्या वडाखालीं बसला होता तोही चारी बाजूंनीं असा गदगद हालूं लागला कीं आतां पडतो कीं मग पडतो. इतक्यांत कडाड् ह्मणून मोठ्यानें आवाज झाला; आणि त्यासरशीं आपल्या स्वाराची अगदीं गाळण उडाली. त्याला वाटलें कीं आपल्या डोक्यावरीलच फांदी मोडली, ह्मणून तो जों उठून बाहेर वर पाहूं लागतो, तों आलीच कडकडत. त्याच्यामागल्या अंगास त्या वडाच्या ती झाडाच्या खोडाला लागून असलेली सगळ्यांत मोठी फांदी, कोसळत आली. त्यासरशी निराशेनें "मेलों! मेलों! देवा! धांव तूंच वांचविणार आतां या संकटांतून या दासाला!" अशी त्या स्वारानें मोठ्यानें आरोळी ठोकली; आणि सर्व साम-सूम झालें. हरहर! काय बिचाऱ्याची स्थिति झाली असेल

बरें? त्याचा घोडाही काढणी तुटून मोकळा झाला. तो वेड्यासारखा आपल्या धन्याचा त्या वडाभोंवतीं शोध करूं लागला. पाऊस अगदीं लख्ख झाला. घटके अर्धघटकेनें चांगलें उजाडून सूर्योदय होण्याची वेळ अगदीं नजीक येऊन ठेपली.

चार महिन्यांच्या रखरखीत उन्हाळ्याच्या तापानें संतप्त झालेली भूमि शांत झाली. पाण्याकारितां सोकलेले वृक्ष आनंदित झाले. पाण्यावांचून अगदीं निस्सत्व बनलेली हरळी हर्षभरित झाली. जमीनीचा सुवास रानामध्यें अगदीं घुमून राहिला. अरुणोदय होऊन पूर्व दिग्वधू केशरी वस्त्र परिधान करून दिग्विजय करण्यास जाणाऱ्या सूर्यास आनंदानें आलिंगन देण्यासच जणुं सिद्ध झाली. चंडोल पक्षी गाऊं लागले. इतर पक्षीही आपापल्या घरट्यांतून बाहेर निघून या नूतन सृष्टीचें कौतुक करीत आनंदानें भूपाळ्याच गात आहेत कीं काय असा भास होऊं लागला. असा जिकडे तिकडे आनंदीआनंद होऊन राहिला. पण त्या बिचाऱ्या स्वाराची वाट काय? तो मेला काय? का जखमी होऊन पडला आहे? अथवा अगदीं सुरक्षित परंतु अडकून राहिला आहे? मेला असेल तर सुटला. जखमी होऊन विव्हळत असेल तर? तर काय?–छे! तो विचारच नको.

पहाटे जेव्हां हा वड पडला त्या वेळीं त्याचा आवाज अति मोठा झाला. आसपास हांके दोन हांकेवरच्या शेतकरी लोकांस तो चांगलाच ऐकूं गेला होता. त्या कित्येकांना तर असेंच वाटलें कीं कोठें तरी वीजच पडली, परंतु त्यांतील जे अनुभवी होते त्यांना, ही वीज नसून एखादा

जबरदस्त वृक्ष मोडून पडला असावा, असा तेव्हांच अंदाज बांधतां आला. त्यांपैकीं एकदोघांना, त्यांतच कोणी तरी मनुष्य 'मेलोंमेलों' ह्मणून ओरडला, असाही थोडासा भास झाला. त्यांच्यापैकीं एक इसम लांबवर न्याहाळीत न्याहाळीत या वेळीं वडाकडे येत होता. इतक्यांत सैरावैरा परंतु आसपासच फिरत राहिलेल्या आपल्या स्वाराच्या घोड्याची नजर या येणाऱ्या गृहस्थाकडे गेली व तो सरळ त्या गृहस्थापुढें जाऊन उभा राहिला. तो एकदां त्या वडाकडे मान करी, फिरून त्या गृहस्थाकडे मान फिरवी, आणि त्याला खुणांनीं त्या वडाकडे चालण्याविषयींच जणूं सुचवी. त्या गृहस्थाला मोठा अचंबा वाटला. तो जरा वडाकडची आपली दृष्टी फिरवून दुसरीकडे पाहूं लागला कीं, हा घोडा झालाच त्याला आडवा. तो वडाकडे फिरून पाहूं लागला कीं घोडा आनंदित झाल्यासारखें दाखवून आपण त्या वडाकडे चालूं लागे. शेवटीं त्या गृहस्थाला वाटलें कीं, आपण आतां ह्या घोड्यामागें जावें. 'पाहूं तर खरें काय होतें तें,' असा विचार करून तो त्या घोड्याच्या मागोमाग चालूं लागला. मुकें जनावर तें, पण त्याचें धन्यावरचें प्रेम इतकें विलक्षण कीं, त्या प्रेमानेंच त्याला ही—कोण पल्लवी ह्मणाल ती ह्मणा—वाणीच दिली. तात्पर्य, त्या घोड्यानें आपला धनी ज्या ढोलींत बसला होता, जिच्यापुढें त्या वडाची प्रचंड फांदी आपल्या सर्व शाखांसह कोसळून पडली होती, तेथें त्या गृहस्थास आणून उभें केलें. त्या घोड्याची सर्व चेष्टा पाहून त्या गृहस्थाची खात्री झाली होती कीं, या घोड्याचा स्वार या वडाच्या पडलेल्या खांदी-खालीं सांपडला असला पाहिजे, त्यानें त्या पडलेल्या

फांदीभोंवतीं फिरून कानोसा घेण्याचा प्रयत्न केला, परंतु त्याला प्रथम कांहींएक सुगावा लागेना. शेवटीं त्यानें त्या पडलेल्या फांदीचा बराच सांठा मोकळा केला व आपणास जरा आंत शिरण्याची व्यवस्था करून तो कानोसा घेऊं लागला. तेव्हां मात्र त्याला आंत कोणी कण्हत आहे असें वाटलें. 'आहे! स्वार जीवंत आहे अजून' असें ह्मणून त्यानें त्यास बाहेर काढण्याची तजवीज चालविली. परंतु तें काम एकट्याच्यानें होण्यासारखें नव्हतें, असें त्याला आढळून आल्यावर कोणी तरी मदतीस मिळाला तर पाहावा, ह्मणून तो चौफेर नजर देऊं लागला. तों त्याला एक धनगर आपला कळप हांकीत येत असलेला दिसला. त्याला 'धनगरदादा, धनगरदादा,' ह्मणून दोनचार आरोळ्या पोंचल्या, तेव्हां तो लगबग तेथें आला, आणि त्या दोघांनीं त्या घायाळ मनुष्यास बाहेर काढण्याचा प्रयत्न सुरू केला. थोडक्या वेळांत तेथें आणखी पांचचार कुळंबी व एक उतार वयाचा मराठा असे येऊन पोंचले. त्या सर्वांनीं आपापल्यापरी त्या पहिल्या दोघां इसमांस त्यांच्या कामांत मदत करण्यास सुरवात केली.

या दहापांच इसमांनीं मिळून खटपट करून ती अवजड फांदी तिच्या सर्व सांठ्यासह बाजूला केली व पाहतात तों आंतील इसम जीवंत असून चांगला सावध आहे असें त्यांस आढळून आलें. परंतु त्याचा एक हात फारच दुखावला असून त्याच्या डाव्या बरगड्या रक्तबंबाळ झालेल्या व खालून पाठाणांत एक घोड्याची कपरी शिरून मासुरडें बाहेर आलें आहे अशा स्थितींत तो असल्याचें

त्यांना दिसलें. त्यांनीं त्यास जपून बाहेर आणण्याची तजवीज चालविली.

इतक्यांत तिकडन एक सुंदर तरुणी व तरुण मराठा असे दोघेही एकाच घोड्यावर बसलेले त्या ठिकाणीं आले; आणि ही काय गडबड आहे ह्मणून शोध करण्याच्या उद्देशानें तो तरुण मराठा खालीं उतरला. तोंच तेथील मंडळीपैकीं तिघा असामींनीं धरून त्या झाडाखालीं चेंगरलेल्या घायाळास बाहेर आणिलें. त्याला पाहतांच या नव्या तरुण गृहस्थानें त्या तरुणीस घोड्यावरून खालीं उतरण्यास सांगितलें व आपण सर्व प्रकाराची चौकशी चालविली. दोघांची दृष्टादृष्ट होतांच दोघेही एकमेकांकडे कांहीं वेळ टक लाऊन पाहूं लागले आणि थोडक्याच वेळांत दोघांच्याही मुद्रेवर आश्चर्य आणि दुःख यांचें एकदम चित्र उभें राहिलें. 'कोण शंभू! हो तोच.' 'आणि आपण कोण—सर्जेराव?' 'होय. सर्जेरावच मी.' 'काय? माझा दादा? अग बाई!' अशा प्रकारानें नवीन सुंदरी व तरुण गृहस्थ आणि तो घायाळ तरुण यांची परस्पर भाषा झाली. त्यांनीं एकमेकांस ओळखलें. मदतीस आलेल्या इसमांपैकीं जो एक उतार वयाचा मराठा होता, ह्मणून सांगितलें त्याचीही या घायाळास पाहून प्रथमपासूनच मोठी चमत्कारिक स्थिति झाली होती. ती या नवीन आलेल्या तरुणीस पाहून तिच्या तोंडचे त्या घायाळाबद्दलचे उद्गार ऐकून तर विशेषच चमत्कारिक झाली. 'कोण रमा काय?' ह्मणून त्यानें एकदम या तरुणीकडे येऊन मोठ्या प्रेमानें डोळ्यांत आंसवें आणून उद्गार काढिला. त्यासरसें रमेचें लक्ष त्याच्याकडे जास्त वेधून तिच्याही तोंडांतून 'काय? बाबा! हैबतराव!'

असे उद्गार निघाले व त्यानें त्या तरुणीस पोटाशीं धरिलें. हें कांयँ गौडबंगाल आहे? याचा सर्जेरावास कांहींच उमज पडेना. तो टक्मक एकदां त्या दोघांकडे तर लगेच त्या घायाळाकडे असा पाहत उभा राहिला. इतक्यांत शंभूनेंही 'बाबा ! बाबा !' ह्मणून मोठ्यानें परंतु कण्हत कण्हतच हाक मारिली. ती ऐकतांच हैबतराव रमेला सोडून त्याच्याकडे वळला. आणि 'शंभू! माझा शंभूबाळ' ह्मणून त्यानें त्याला आपल्या पोटाशीं धरिलें आणि क्षणार्धांत त्याचें सर्व शरीर अश्रूंनीं भिजविलें. असो. हैबतराव हा या रमा व शंभू यांचा बाप होय. हें वाचकांनीं आतां ताडलेंच असेल. सर्जेराव, या वेळीं रमेला भावास भेटल्यास बरेच दिवस झाले असल्यामुळें आणि स्वतःस बरेच दिवस बाहेरमुलखीं कांहीं सरकारी कामास जावें लागणार असें माहीत असल्यामुळें, तिला फलटणास शंभूकडे पोंचविण्यास निघाला होता. शंभू नाइकांच्या कांहीं कामानिमित्त त्या प्रांतांत जात होता, आणि हैबतराव मात्र या वेळीं तेथें कसा आला हें कांहींच कळत नाहीं. बाप व हीं दोन्ही लेकरें, आज जवळ जवळ दीड तप झालें, एकमेकांस मयत समजून होतीं, परंतु ईश्वरानें त्यांस हा आज किती आनंदाचा दिवस दाखविला बरें? त्यांच्या या वेळच्या आनंदाचें आणि आश्चर्याचें वर्णन कोण करूं शकेल? त्या वेळेस परम श्रेष्ठ योग्यास शाश्वत सुखाच्या प्राप्तीपासून होणारा सदानंदच आपणांस मिळाला असें त्यांस वाटलें, आणि आपण इमामशाहीच्या प्रचंड वणव्याच्या राक्षसी ज्वाळांनीं दशदिशांनीं अगदीं वेढलेलों आहों, हेंही ते विसरले. अशा त्या आनंदांत हें लहानसें

मराठमंडळ ईश्वराचे अत्यंत कृत्यज्ञतापूर्वक आभार मानून शंभूच्या जखमांस, वारा लागूं नये ह्मणून, फडकीं गुंडाळण्यांत व एकमेकांची वियोगकालांतील हकीकत विचारून घेण्यांत दंग झालें होतें. कुळंबी लोक शंभूस नेण्याकरितां डोली आणण्यासाठीं गांवांत गेले होते. शंभूचे पाय शाबूत होते. तथापि पाठाण, पेकाट, बरगड्या आणि एक बाहुटी हीं इतकी दुखावलीं होतीं कीं त्याला आपल्या शाबूत पायाचा कांहीं एक उपयोग करतां येण्यासारखा नव्हता. कारण चालतांनां मिळणारी गति सहन करण्याची शक्ति वरील शरीरांत नव्हती.

सापाचा दंश सत्ताधाऱ्यांचा कटाक्ष आणि सुंदर स्त्रीसंबंधाचा दावा हीं केव्हां, कोणास, कोठें आणि कशीं भोंवतील याचा कांहींएक नेम नाहीं. कुळंब्यांनीं डोली आणून शंभूला आंत ठेविलें आणि ते व ह्मातारा हीं चालूं लागलीं. सर्जेराव शंभूच्या घोड्यावर जीन घालून तंग आवळीत होता आणि रमा आपल्या घोड्यावर बसून सर्जेरावाची वाट पाहत होती. तों एकदम एक मुसलमान स्वार चौखूर घोडा टाकीत तेथें आला आणि त्यानें सर्जेरावाच्या हातांत एक लखोटा दिला. सर्जेरावानें तो लखोटा फोडून वाचून पाहिला व 'अच्छा, हम आजके आज निकल आते है हुकुमके मुआफक्, ऐसा कहके सरदारसाबकू हमारा बहोत सलाम बोलना' ह्मणून त्या स्वारास जबाब दिल्यावर स्वार परतला आणि रमा व सर्जेराव गांवांत चालते झाले. आपणही आतां या सर्वांस येथेंच सोडूं आणि तिकडे वेरुळाकडची काय खबर आहे तें पाहूं.

## प्रकरण १४ वें.

वेरुळास मुलांमाणसांची व्यवस्था लावून, व थोडक्याच दिवसांत निर्वाहापुरती मिराशी हक्काची जमीन संपादन करून मालोजी शिंदखेडास सेनापति लखूजी जाधवराव यांच्या भेटीस गेला. तेथें आपली सर्व हकीकत सांगून त्यानें जाधवरावांची, आपणांस एखादी शिपायाची नोकरी देण्याबद्दल विनंती केली. जाधवरावास ती मान्य होऊन त्यानें त्यास आपल्या पदरीं ठेवून घेतलें.* याप्रमाणें क्षत्रियाला अनुचित असली नांगरबहाद्दुरी सुटून मालोजीच्या हातांत तरवार आली, आणि तेथून त्याच्या बुद्धिबळाच्या डावाची सुरवात झाली.

---

* उभयतां मालोजी व विठोजीराजे भोंसले ग्रामसंबंधीं वृत्तीचा कब्जा करून कबिले घेऊन कसबे वेरूळ नजीक दौलताबाद येथें येऊन शेतें करून राहिले होते.

याउपर तेथें मुलेंमाणसें ठेवून चाकरीचे उमेदीनें कसबे शिंदखेडास आले. तेथें राजश्री लखूजी जाधवराव देशमुख सरकार दौलताबाद मनसबदार निजामशाहाचे ( यांस ) बारा हजार स्वारांची दौलत होती त्यांस भेटून त्यांची चाकरी दरवाजावर पायबारागिरी करून राहिले.

शरीरेंकरून पुष्ट होते. घोडे स्वारीस त्यांस खालीं टिकेनात. भोजन पंक्तीस व दरमहा होन पांच देत असतां कित्येक दिवस गुजराण केली. कबिलेही त्या स्थळास आणिले.

—मराठ्यांची छोटी बखर.

भाऊबंदकीचा त्रास चुकला. हातचा नांगर सुटला. आवडती समशेर मिळाली. बसावयास सरकारी घोडा लाभला. राजकारणांची माहिती होऊं लागली. एकंदरींत बहुतेक मनासारखें जमलें. तथापि अजून संतति मात्र मुळींच लाभली नाहीं. बिचारी पाटलीणबाई तर मालोजीचा मुलगा पाहण्याची निराशा बरोबर घेऊन नुकतीच कैलासवासी झाली होती. मालोजीपेक्षांही दिपाबाईला हें वांझपणाचें दुःख फारच जाचीत असे. तिनें त्याकरितां संकट सोमवार, आळणी आदितवार, प्रदोष, शिवरात्र वगैरे कितीक उपोषणें आणि व्रतेंवैकल्यें करावीं. मालोजीलाही एकादशी, सोमवार, प्रदोष, शिवरात्र वगैरे, आपल्या कुळपरंपरागत शिवोपासनेस योग्य असे उपवास व व्रतें वगैरे असतच. विठूजीला आतां चांगले चार पाठोपाठचे मुलगे होते. तींच आपलीं मुलें असें समजून मालोजी व दिपाबाई आपलें समाधान मानून घेत असत. शंभुमहादेवाची वार्षिक वारी, आतां इतक्या लांबूनही, त्याची कधीं अंतरत नसे. त्याचप्रमाणें पाटलीणबाईच्या पश्चात् तुळजापुरच्या देवीचेंही वार्षिक दर्शन, पूजन वगैरे आतां यांसच करणें प्राप्त; आणि तेंही हीं दोघें नवराबायको मोठ्या प्रेमानें आणि श्रद्धापूर्वक करीत असत. हीं दोन्हींही या घराण्याचीं कुलदैवतेंच यांचा अव्हेर झाल्यावर त्यांस कुलीन कोण ह्मणेल? आणि उत्कर्षाची आशा तरी कशी सफल व्हावी? स्ववर्णाश्रमधर्मविहित कर्मे, कुळाचार, देशाचार, इत्यादि सर्व यथासांग आणि यथाविधि यथाशक्ति पाळील तोच खरा. त्याचाच जगांत उत्कर्ष होतो. 'सत्यमेव जयते' हा आशीर्वाद त्यालाच उद्देशून

आहे. आतां आपत्काळीं त्यांचें स्वरूप कित्येक वेळां येत्रढें-तेवढें बदलावें लागतें, अथवा त्यांत कित्येकदां लोप करावा लागतो; तथापि ही रूपपालट व गाळागाळी केवळ बाह्यतः व प्रसंगापुरतींच न्याय्य होत. त्यांचें अन्त:स्वरूप आणि आचरणाराचे मानसिक संस्कार ह्यांत लेशमात्र फरक पडतां कामा नये इतकेंच नव्हे, तर जों जों आपत्काळ येईल तों तों त्यांचें अन्त:स्वरूप अग्नींत पडलेल्या सोन्याप्रमाणें जास्त उज्ज्वल, जास्त शुद्ध आणि जास्तच कडक बनलें पाहिजे. तरच स्वाभिमान, कुल, ग्राम, देश, राष्ट्र यांचा अभिमान जागृत व जोमांत राहून आलेल्या आपत्काळांतून कोणासही डोकें वर काढतां येण्याचा संभव आहे. वरील प्रकारचीं तत्त्वें मालोजीच्या अगदीं हाडीं खिळलेलीं असत. तो व दिपाबाई त्या तत्त्वांस अनुसरूनच वागत. साधुसंत, अतिथिअभ्यागत आणि देवब्राह्मण यांचें यथाशक्या संतर्पण करण्यांत तीं नेहमीं तत्पर असत. दौलताबादच्या किल्ल्यावर असणाऱ्या जनार्दनस्वामींचें दर गुरुवारीं दर्शन घेणें व त्यांचा उपदेश श्रवण करणें दोघांसही फार आवडे. मुसलमानांतील पीरफकीरांचाही त्यांनीं कधीं द्वेष केला नाहीं, इतकेंच नव्हे तर 'जेथें जेथें सत्वगुण विशेष आढळेल तेथें तेथें माझीच विभूती समजावी' ह्या श्रीकृष्णोक्तीच्या कसोटीनें पीरफकीरांतही जे अत्यंत योग्य दिसतील त्यांचा प्रसंगीं योग्य सत्कारही तीं करीत असत.

अशा प्रकारें क्रम चालत असतां जाधवरावाचीही, कामाकाजाच्या हुशारीमुळें, मालोजीवर विशेष मर्जी बसून दोघांचा दाट परिचय झाला. मग वेरूळचें बिऱ्हाड मोडून

शिंदखेडासच राहवयास यावें असा जाधवरावांचा आग्रह पडल्यामुळें मालोजी व विठोजी उभयतां बंधू शिंदखेडास राहावयास आले. वेरूळच्या मिराशी आणि देउळगांवाकडील पाटिलकीच्या वगैरे जमीनींच्या वसूलाची आणि एकंदर हिशेबठिशोबाची व्यवस्था आवजी गोविंद ह्मणून एका हुशार व विश्वासू ब्राह्मणाकडे सोंपवून दोघेही बंधू आपल्या लष्करी पेशांत अगदीं मग्न राहिले.

या सुमारास अहमदनगरकर व विजापूरकर यांच्या दरम्यान पुष्कळ कटकट वाढली होती, आणि सरहद्दीवर त्याचप्रमाणें कित्येक प्रसंगीं एकमेकांच्या मुलखांत शिरून-ही दोघांचीं सैन्यें लढत असत. या लढायांत मालोजी-राव बहुतकरून हजर असे; आणि त्यांत त्यानें आपला पराक्रम पुष्कळ वेळां शत्रूच्या व त्याचप्रमाणें आपल्या लोकांच्या चांगलाच प्रत्ययास आणून दिला होता. त्यामुळें त्याची इभ्रत बरीच वाढली होती. प्रसंगानें जाधवराव मालोजीच्या हाताखालीं शंभरशंभर, दोनदोनशें स्वार देऊनही त्याला एखाद्या कामगिरीवर बिनवास्त पाठवून देत. तथापि, कां तें कोण जाणें, त्यानें त्यास येवढी तेवढी कायमची मोठी जागा कधींच दिली नाहीं. मात्र बहुमोल शस्त्रें आणि वस्त्रें यांचीं बक्षिसें तो त्यास वारंवार आणि पुष्कळ देत असे.

संतति नसल्याचा खेद आतां उत्तरोत्तर वाढत जाऊन त्याबरोबरच मालोजीचें औदार्य आणि धर्मादाय हीं वाढत चाललीं. शंभुमहादेवास रुद्रानुष्ठान, नंदादीप वगैरे सुरू करून वर पाणी नसल्यानें यात्रेकरूंस होणारा ताप दूर करण्याच्या इच्छेनें त्यानें तेथें एक तलाव बांधण्याचें काम

सुरू केलें. ह्या कामाकरितां त्यानें शेषोजी नाईक पुंड्यांकडून बरीच रक्कम उसनवारही काढली, आणि त्या तलावाचें काम पुरें करण्याकरितां व त्याची वास्तुशांत वगैरे करण्याकरितां तो एक चारसहा महिन्यांची रजा घेऊन शंभुमहादेवास जाण्याच्या विचारांत होता. तोंच त्याला निंबाळकरांकडून शंभू हरवल्याची बातमी लागली. त्याचप्रमाणें रमा बाळंतपणाकरितां फलटणास यावयास निघाल्याची वर्दी असून आज सहा महिने झाले तरी ती आली नसून तिच्या नवऱ्याचाही त्याच्या गांवीं शोध लागत नाहीं. मात्र तो मृगसराईच्या अव्वेलीस रमेस घेऊन फलटणाकडे जावयास निघाल्याचें त्याचे शेजारी सांगतात.

याप्रमाणें ही भयंकर हालहवाल कळतांच मालोजीच्या अंगाचा अगदीं तिळपापड झाला. ज्या तीन माणसांची ही अशी भयसूचक बातमी होती तीं तिन्हीं माणसें, वाचकांस ठाऊकच आहे कीं, मालोजीनें संसारास लावलेलीं होतीं. रमा व शंभू हीं तो आपलीं पाठचीं भावंडेंच समजे. सर्जेराव तर त्याचा जिवलग मित्रच झाला होता, आणि शिवाय तो रमेचा नवरा. मग काय ? दुहेरी प्रेम. शिवाय, ही बातमी कळतांच त्याला हैबतरावाची व रामभट सीताबाई यांचीही आठवण झाली आणि हैबतरावाबद्दल ‘ आपण त्याला फिरून कधीं तरी सुखाचा दिवस दाखवूं आणि कदाचित् आपला अंदाज खरा असेल तर रमा व शंभू यांसही त्यांच्या बापाची जोड करवून देऊन कृतार्थ होऊं ’ अशी जी त्याला एक मोठी उमेद उत्पन्न झाली होती ती सर्वस्वी मावळली. त्याला या हरवलेल्या माणसांचा पत्ता लावण्याची कांहीं युक्ति सुचेना. या वेळीं

जर लक्ष्मणभट्ट असते तर त्यांनीं हें शोधाचें काम मुसलमानांच्या डोळ्यांवर न येतां केलें असतें अशी त्याची खात्री होती. परंतु लक्ष्मणभट्ट याही वेळीं उदेपुराकडेच गेले असून वर्ष सवा वर्ष झालें तरी, परत आले नव्हते. तेव्हां खुद्द त्यांच्याबद्दलसुद्धां मालोजीस आणि त्यांच्या इतर माणसांस अगदीं काळजी लागून राहिली होती. शेवटीं शंभुमहादेवावरच सर्व गोष्टींचा भार ठेवून धर्माजी, रामजी, आवजी गोविंद वगैरे पांचसहा माणसें, समयसूचक, विश्वासू आणि धाडशी अशीं बरोबर घेऊन मालोजी, मागील सर्व व्यवस्था विठूजीवर सोंपवून, शंभुमहादेवास जाण्यास निघाला. दिपेनें ‘ मी बरोबर येत्यें ह्मणून बराच हट्ट घेतला.’ परंतु जत्रेच्या सुमारास वास्तुशांतही होईल तेव्हां तुह्मीं सर्व माणसें बरोबरच या ’ अशी तिची मालोजीनें समजूत केली; तेव्हां ती स्वस्थ बसली.

प्रवास सुरू होतांच पहिल्या मुक्कामीं रामजीस फकिराचा वेश घेऊन कांहीं खुणेचीं ठिकाणें सांगून शंभू, रमा व सर्जेराव यांचा शोध लावण्यास रात्रंदिवस खटपट करण्याचा हुकूम सुटला. आवजी गोविंद यांस एकटेंच शिखरावर जाऊन तलावाचें काम लवकर संपविण्याची ताकीद झाली, आणि धर्माजीसह मालोजीची खासा स्वारी हैबतराव व रामभट्ट यांच्या समाचारास निघाली. या तिघांच्या तीन वाटा झाल्यावर एकमेकांची बातमी एकमेकांस ताबडतोब कळण्याकरितां इतर जी रावबाभिवब्रांसारखी दोन तीन माणसें होती त्यांना शिकवणी मिळून हें एक चित्रगुप्त सैन्यच आपल्या कामास लागलें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. एकदोन दिवसांतच मालोजीरावाच्या खास विनंतीवरून

जाधवराव व निंबाळकर यांच्या सहीशिक्क्याचीं पत्रें व कांहीं नाजूक ठिकाणीं अचूक उपयोगी पडण्यासारख्या खुणेच्या वस्तूही येऊन पोंचल्या. पुंड्यांकडे पाठविलेला मनुष्य त्यांजकडून हर ठिकाणीं उपयोगीं पडणाऱ्या त्यांच्या लहानमोठ्या वीसपंचवीस हुंड्या घेऊन मालोजीस येऊन मिळाला. शिवाय जाधवराव, निंबाळकर आणि पुंडे या त्रिवर्गांची डांकेची व्यवस्था वाटेल तेव्हां वाटेल तशी आपल्या उपयोगास आणतां यावी ह्मणून त्यांची तशी परवानगीही मालोजीनें घेऊन ठेविली होती. पुंड्यांकडे त्यानें या कामाकरितां आपली वेरूळची सर्व जमीन गहाण लावून दिली होती. असो. आपणही आतां यांना येथेंच सोडून स्वतंत्र रीतीनें रमा सीताबाई वगैरेंचा शोध करण्यास जाऊं.



## प्रकरण १५ वें.

नवरात्राचे दिवस. पाऊस बहुतेक संपलाच. वनश्री आपल्या पूर्ण तारुण्यांत. शेतें कापणीस आलेलीं. तीळ, झेंडू वगैरे फुलून जिकडे तिकडे सुवर्णमय झालेलें. रत्न-गर्भावसुंधरेनें या वेळीं जणु नानारंगी पुष्पमिषानें आपल्या पोटांतील हिरे, पाच, गोमेद, नील, लाल, शनि, अहेरा, गहिरा, समुद्रापासून मोत्यें, पोवळीं वगैरे हरएक रत्नें बाहेर काढून त्यांचे विविध अलंकार बनवून आपण धारण केले आहेत कीं काय असें वाटत होतें. एखाद्या गर्भश्रीमंताची अप्रतिम सुंदर स्त्री, सुलभप्रसूति होऊन मुलगा झालेली, बाळंतपण मानवलेली व नुकतीच बाळंतपणांतून उठून

उल्हासानें आपलें सुवर्ण, गौर, गोंडस व उत्तम बाळसदार मूल घेऊन, प्रथमच देवदर्शनास अथवा पुण्यक्षेत्रीं गंगापूजनास निघतांनां जशी नयनमनोहर दिसते, तद्वतच या वेळीं भूमि दिसत होती. गंगथडी, भिमथडी यांमधील प्रदेश प्रत्यक्ष ज्यानें पाहिला असेल त्यालाच वरील वर्णनानें समाधान वाटेल.

अशा दिवसांत एके दिवशीं सकाळीं दहा घटकांस एक ब्राह्मणस्त्री व एक चारपांच वर्षांचा मुलगा भीमेच्या काठानें प्रवास करीत होतीं. भीमेस या दिवसांत उतार हमेश असावयाचा. ह्मणून सकाळीं निघतांनां जवळपास अमुक ठिकाणीं उतार आहे असा शोध काढून ती बाई मुलाला घेऊन निघाली होती. ऊन बरेंच जाचूं लागलें होतें. तरी उतार उतरून पलीकडे गेलें ह्मणजे मुक्काम करावयाचा अशा इराद्यानें बाई तीरावर आली. पाहते तों, काय तें भयंकर भीमरूप त्या भीमेचें! दुःशासनाच्या अपकारानें संतप्त होऊन खादिरांगाराप्रमाणें लाल दिसणाऱ्या भीमस्त्रीचेंच उग्र स्वरूप या वेळीं भीमेनें धारण केलें होतें. या स्त्रीचीही तीच स्थिति होती. तिची व तिच्या नवऱ्याची इमामशाहीच्या दुःशासनानें आज ७।८ महिने ताडातोड केली असून त्याच्या शोधार्थ ती हिंडत होती. तिला आपल्या जीवीत्वाचाही कंटाळा आला होता, परंतु क्षणोक्षणीं मनांत येणारे आत्महत्या करण्याचे विचार ती केवळ आपल्या या सकुमार पुत्राच्या ममतेनें दाबून काळाचे दिवस कंठीत होती. वर उगमाकडे अतिशय पाऊस पडून भीमेला महापूर आला होता. ती अगदीं दुथडी भरून जोरानें वाहत होती. नांवेवांचून पलीकडे जाण्याचा इलाजच नव्हता.

पलीकडच्या तीरास नाव दिसत होती, परंतु ती यांच्यासाठीं अलीकडे आणाऱ्याची कोणी ?

कर्मधर्मसंयोग असा झाला कीं पलीकडील तीरावर एक वृद्ध मराठा येऊन पोंचला. त्याला कांहीं कामानिमित्त ही बाई ज्या तीरास होती तिकडेसच यावयाचें होतें. त्यानें नाववाल्यास सांगून नांव सोडली. ही नाव परत जातांनां आपण पलीकडच्या तीरास जाऊं असें त्या बाईनें आपल्या रडवईस आलेल्या व भुकेनें अगदीं व्याकुळ झालेल्या मुलास सांगितलें. हा गृहस्थ हैबतरावच होता. या बिचाऱ्यावर असा दुर्धर प्रसंग आला होता कीं, रमा, शंभू व त्याची गांठ पडल्यानें त्याला झालेला आनंद पार सर्व लयास जाऊन, आपणांस आपलीं मुलें नसतीं लाभलीं तरी तें फार उत्तम झालें असतें असें त्याला वाटूं लागलें होतें. कारण सर्जेरावास देखतहुकूम कामगिरीवर निघून जाण्याचें आज्ञापत्र आलेलें वाचकांस माहीतच आहे. पुढें शंभू व हैबतराव यांच्या स्वाधीन रमेला करून सर्जेराव निघून गेला. इकडे शंभू बरा होऊन बहिणीस व बापास फलटणास घेऊन जाणार तों त्यासही अचानक कैद करून कोण कोठें घेऊन गेले याचाही त्या बिचाऱ्या हैबतरावास व रमेस कांहीं पत्ता लागला नाहीं. रमेला तर जवळजवळ सात महिने गेले असून ती त्या गर्भाच्या भारानें इतक्यांतच इतकी खंगली होती कीं जणूं नववाच महिना टेंकला आहे, आणि आज सकाळपासून तर तिच्या पोटांत दुखूं लागून तिची अगदीं तारांबळ उडाली होती. शंभूनें व तो गेल्यावर हैबतरावानेंही फलटणास व

वेरुळास दोनतीन निरोप व पत्रें पाठविलीं, परंतु चमत्कार असा कीं एकही ठिकाणीं पोंचलें नाहीं.

पलीकडील तीरावर एका शेतकऱ्याच्या म्हातारीचें व हैबतरावाचें फार सख्य जमलें होतें. तिला बोलावण्याकरीतां तो या वेळेस तिकडे चालला होता. परतीरास जातांच त्याला हीं दोन्ही मायलेकरें दिसलीं. तेव्हां सहजच त्यानें त्यांस ओळखिलें; आणि त्यांची दीन मुद्रा पाहून जातांजातांच चौकशी चालविली. तेव्हां दीन स्वरानें त्या ब्राह्मणस्त्रीनें त्याची अशी विनंती केली कीं 'बाबा देवानेंच तुम्हांला आज येथेंच या अबलेचें गाऱ्हाणें ऐकण्यास पाठविलें आहे. तेव्हां कृपा करून तुम्ही आमची सर्व हकीकत जरा स्वस्थपणानें ऐकून घ्यावी.

हैबतरावास कोठें वेळ होता? परंतु तो म्हणाला, चला. तुम्ही मजबरोबर चालतां चालतां मी तुमची गोष्ट ऐकून घेईन. कारण मला वेळ नाहीं. माझी मुलगी बाळंत होण्यास टेंकली असून तिच्याजवळ कोणी नाहीं. त्यासाठीं मी लगबगीनें या जवळच्या शेतांत एक गरीब कुळंबीण म्हातारी राहते, तिला मी बोलावूं जात आहें. तुम्हांलाहीं पलीकडल्या तीरास जावयाचें आहे. बरोबरच जाऊं. 'तात्पर्य, चालतां चालतांच सीताबाईनें आपली सर्व हकीकत हैबतरावास कळविली, आणि त्यानेंही आपली व आपल्या मुलाची कशी गांठ पडली वगैरे तीस सांगून तिवेंही त्या म्हातारीस घेऊन फिरून परत आलीं; आणि नावेंत बसून गंगापार झालीं. तीं म्हातारीस घेऊन झोंपडींत येतात तों रमा बेशुद्ध पडली होती. एकीच्या जागीं दोन बायका ईश्वरानें रमेच्या साह्यार्थ पाठविल्या. त्यांनीं तीस लगेच शेकशेगडी

करून शुद्धीवर आणलें. म्हातारी दोन दिवस राहून फिरून आपल्या शेतावर चालती झाली. ब्राह्मणस्त्री व तिचा मुलगा यांस हैबतरावानें जवळच एक दुसरी झोंपडी बांधून तेथें ठेवून घेतलें.

रमा पुढें तीन साडेतीन महिन्यांनीं योग्य वेळीं बाळंत होऊन तिला मुलगा झाला. या ब्राह्मणस्त्रीनें प्रसंग जाणून त्या मराठ्या स्त्रीचें बाळंतपण केलें. असल्या वनवासांतही नातू पाहून हैबतरावाला ब्रह्मानंद झाला.

रमेवरील सात महिन्यांनींच बाळंत होण्याचा प्रसंग टळून ती आतां पुऱ्या महिन्यांची बाळंतीण होऊन ईश्वरकृपेनें तिचें मूल सर्वावयव पूर्ण व चांगलें तजस्वी होतें.

रमावदनचंद्रास खग्रास ग्रहण लावण्यास टपलेले राहूकेतू आपली संधि साधण्यास सारखें झटतच होते. त्यांनींच शंभूचीं व हैबतरावाचीं पत्रें व निरोप इच्छित स्थळीं न पोंचण्याची तजवीज राखली होती. त्या दुष्टांनीं त्याच गांवांत पैसे भरून चार माणसें फितूर करून ठेविलीं होतीं. त्यांनीं वरकरणी रमा, हैबतराव वगैरेंशी अगदीं मित्रांसारखें वागून वेळच्या वेळीं तिकडील सर्व भेद आपणांस द्यावा अशी त्यांस त्यांची सक्त ताकीद होती. गरोदर असतांनांच जर आपण तिला पकडलें तर कदाचित ती जीवही देईल, आणि तिच्यावर बऱ्याच आपदा आल्यावर ती जरा नरम येईल व आपणांस वश होईल अशा अटकळीनें त्यांनीं तिच्या माणसांची व तिची अशी हळुहळु ताडातोड करण्याचा विचार अमलांत आणिला होता. त्याप्रमाणें नवरा, भाऊ वगैरे मेल्याची बातमी तिला देऊन या जगांतील त्यांच्यापासून होणाऱ्या सुखा-

बद्दल तिची निराशा झाली ह्मणजे आपला उद्देश सिद्धीस नेण्याचा त्यांचा विचार होता.

रमेस बाळंतीण होऊन तीन महिने होतात तोंच शंभुराव मेल्याची बातमी त्या लांचखाऊ शेजाऱ्यांपैकीं एकानें हैबतरावाला दिली. आपण स्वतः त्याला मरून पडलेला पाहिला ह्मणून अगदीं खात्रीलायक पुरावा त्या शेजाऱ्यानें आपल्या पोराकडून करविला. कांहीं दिवसांवर त्याची व एका पाहरेकरी मुसलमानाची मारमारी होऊन त्या पाहरेकऱ्यानें त्याला ठार केलें ह्मणून एक बनावट गोष्टही त्यांनीं त्यास सांगितली. झालें. रमेचा व हैबतरावाचा सर्व आशातंतुच तुटला. त्यांना वाटत होतें कीं निंबाळकर नाईक व मालोजीराव हे दोघे हर प्रयत्न करून शंभूस सोडवितील आणि शंभू सर्जेरावाचा शोध करील, व फिरून आपणास सुखाचे दिवस खास येतील, परंतु ती सर्व आतां निराशा झाली. हैबतराव व रमा यांच्या तोंडओळखीचे कांहीं मुसलमानही क्वचित् क्वचित् आपल्या शेजाऱ्यांकडे येतांनां त्यांच्या दृष्टीस पडूं लागले. एक दिवस सीताबाईच्याही ओळखीचा एक आरब त्या ठिकाणीं तिला दिसला. या राज्यसत्तामदांध लोकांची पापी नजर त्या अबलांस अत्यंत भीति व त्रास देऊं लागली. शेवटीं आपलें या ठिकाणीं राहणें फार धोक्याचें आहे असें हैबतराव, रमा व सीताबाई या त्रिवर्गास वाटून त्यांनीं तेथून कोठें तरी निर्जन व दुर्गम स्थळीं जाऊन राहण्याचा निश्चय केला, आणि जातांनां आपणांस कोणी ओळखूं नये ह्मणून स्त्रियांनीं अगदीं कंगाल जातीच्या पुरुषांचे वेश घेऊन अंगास, गौरवर्ण लपविण्याकरितां, चिरगुटांची राख तेलां-

त फांसून लावण्याची तजवीज करून, केवळ वडाऱ्याप्रमाणें बनून त्या सर्वांनीं, तेथून अमावास्येच्या काळोख्या रात्रीं अवशींच कोणास न कळत कूच केलें

## प्रकरण १६ वें.

हरवलेल्या माणसांच्या शोधार्थ मालोजीनें चालविलेले प्रयत्न लवकर सफल होण्याची बहुतेक निराशाच झाली. माघ महिना संपत आला, तथापि कांहीं कोणाचाच पत्ता लागेना. शेवटीं मालोजी तर शिखरावर गेलाच, कारण तेथील तलावाचें काम संपवून त्याची जत्रेच्या अगोदर वास्तुशांती करावयाची ह्मणून त्याचा दृढ संकल्प झाला होता. रामजी वगैरे मंडळी मात्र आपल्या चित्रगुप्ताच्या कामांतच फिरत होती.

लक्ष्मणभट्ट उदेपुराकडे गेले होते; आणि त्यांना तिकडे जाऊन आतां जवळजवळ दोन वर्षें व्हायला आलीं. तथापि त्या प्रतापाची प्रतापभूमी त्यांना सोडवेना. वास्तविक मेवाडांत राहणें या वेळीं फार धोक्याचें झालें होतें. तो हट्टी, दुष्ट व विषयी अकबर आज बारा वर्षें त्या प्रतापार्णवास आटविण्यास सारखा झटत होता. लाखांवारी सैन्य दर-चेवर प्रतापावर पाठविलें जात होतें. जयपूरवाला मानसिंह —ज्याला कुग्रामसिंह नांव असतें तर बरें—आपल्या सर्व रजपूत सैन्यासह मेवाडच्या स्वातंत्र्यसूर्यास खग्रास ग्रहण लावण्यास कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ या न्यायानें, अकबराचा —चितोडास हजारों बायका, पोरी, मुलें वगैरेंचा नाहक जोहारांत बळी घेणाऱ्या राक्षसाचा—मुख्य सेनापति झाला

होता. भीष्मार्जुनांप्रमाणें पराक्रमी असे प्रतापाच्या बाजूचे सहस्त्रावधि वीर या अर्वाचीन भारतीयुद्धांत स्वराष्ट्र, स्वधर्म व स्वातंत्र्य यांसाठीं समरांगणीं पडून प्रतापाची युद्धारंभीं असलेली बावीस हजार सेना आतां अगदीं नाहींशी झाली होती. प्रत्यक्ष समरांगणांत प्रतापाचा पराजय शत्रूच्या दसपट सैन्यासही कधीं करितां आला नव्हता. परंतु कपटानें व वरचेवर रक्तबीजाप्रमाणें नवीन नवीन असंख्य सेना पाठवून अकबरानें सर्व मेवाड भयाण व उध्वस्त केलें होतें. मेवाडांत या वेळीं विशीच्या आंतील व साठींच्या पलीकडे मात्र जे काय पुरुष जीवंत असतील तेवढेच. सर्व देश बेचिराख बनून गेला होता. हजारों स्त्रिया सती जाऊन कुमारिका व वृद्धा मात्र कांहीं शिलक राहिल्या होत्या. स्वतः प्रतापाजवळ एखादा हुजऱ्यासुद्धां उरला नसून त्याला आपल्या सर्व कुटुंबासह रानांत राहून शेवाळाच्या भाकरीवर निर्वाह करावा लागत असे. मुलांस कधीं कथलाच्या खाणींत, तर कधीं खळ्या खणून त्यांत खालींवर गवत घालून निजावें लागे. इतकें झालें तथापि तो धैर्याचा मेरु यत्किंचितही डगमगला नाहीं. अशा प्रकारची त्या महात्म्याची स्थिति ऐकून लक्ष्मणभट्टांच्यानें त्याचें प्रत्यक्ष दर्शन घेतल्यावांचून परत येववेना. तथापि त्यांनीं मोठ्या मेहनतीनें एका व्यापारी तांड्याबरोबर तिकडील सर्व कच्ची हकीकत इकडे लिहून पाठविली. त्यांत शेवटीं 'उत्तरेंतील हिंदूंची ज्याप्रमाणें प्रतापसिंहजी लाज राखीत आहेत, त्याचप्रमाणें त्याच कुळांतील जे आपण, त्यांनीं दक्षिण देशांतील हिंदूंची लाज राखली पाहिजे,

तरच त्या कुळांत जन्मास येण्याचें सार्थक, नाहीं तर फुकट ' असा मालोजीस गोड उपदेश होता.

वरील पत्र तलावाच्या वास्तुशांतीच्या दिवशींच येऊन पोंचलें; आणि तें लक्ष्मणभट्टांचे चिरंजीव भास्करभट्ट यांनीं वाचून दाखविलें. पत्रांतील मजकूर ऐकतांनां मालोजी-प्रभृतींच्या नेत्रांतून सारखे अश्रू वाहूं लागले. मालोजीचा कंठ दाटून आला. त्याला कांहींएक बोलवेना. त्यानें फक्त 'भल्याची लाज राखणें हें त्या शंभुमहादेवाकडे आहे ' असा उद्गार काढला. परंतु त्याच्या अंतःकरणास असे पीळ पडले होते कीं कांहीं विचारूं नका. तो सारखा श्रीशंभुमहादेवा-च्या ध्यानांत मग्न झाला. 'आपण तर आतां बरेच मोठे झालों. आपल्या हातून यापुढें काय शतक्रतु होणार? शिवाय अपुत्र असल्यानें पुढचीही आशा तितकीच. तरी पण ईश्वराच्या मनांत असेल तर हा दासही कांहीं तरी अलौलिक कृती करून पुढल्या पिढीस स्वाभिमानाचें उत्तम वळण लागेल असें करून दाखवील. 'नर करणी करे तो नरका नारायण हो जाय.' दृढनिश्चयानें, फलाशा न धरितां, कर्तव्य ह्मणून कोणतेंही चांगलें काम करणें आपल्या स्वाधीनचें आहे, तें तर आपण करूं. मग त्याचा परिणाम उत्तम करणें हें ईश्वराचें काम. तें तो करो वा न करो.' अशा प्रकारानें जन्मास आल्यासारखें कांहीं तरी आपल्या सूर्यवंशी क्षात्रकुलास शोभेल असें महत्कृत्य करण्याचा त्याचा अगदीं दृढ निश्चय झाला.

लक्ष्मणभट्टांचे चिरंजीव भास्करभट्टही फार तेजस्वी, बृहस्पतीप्रमाणें बुद्धिवान आणि मोठे सत्पात्र होते. त्यांचें वय लहानच होतें. तथापि त्यांनीं आपल्या मनोवेधक

भाषणांनीं व आदरसत्काराच्या पद्धतीनें पत्र घेऊन येणाऱ्या व्यापाऱ्यांचें चार दिवस शिखरावर राहण्यास मन वळविलें; आणि वास्तुशांति वगैरे आटोपल्यावर खालील आशयाचें इकडील हकीकतीचें एक पत्र आपल्या बापास देण्याकरितां विनंती करून त्या व्यापाऱ्यांची पाठवणी केली.

तें पत्र असें होतें:—

"तीर्थरूप वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री लक्ष्मण-
भट्ट बाबा यांस,

बाळक भास्कराचें त्रिकाळ चरणीं मस्तक असो, विशेष.

आपली आशीर्वादपत्रिका पावली. वाचून फार आनंद झाला. राजे यांस वाचून दाखवितां त्यांनाही परम हर्ष झाला. उदेपूरचे महाराणे प्रतापसिंहजी यांचे स्वधर्मोद्धाराकरितां चाललेले भगीरथ प्रयत्न ऐकून राजांस व आह्मां सर्वांस फार धन्यता जाहली. राजांना आपला उपदेश शिरसावंद्य आहे. राजांचीही आपले धर्माचे ठायीं आणि देवब्राह्मणांचे ठिकाणीं निष्ठा उत्तम आहे. त्याचप्रमाणें जगांत अखंड कीर्ति राहे ऐशी कांहीं महत्कृती करण्याची राजांचीही उमेद मोठी आहे. ते कुलोद्धार करतील खास. श्रीशंभु-महादेवही, तिकडे जसे प्रतापसिंहजीस श्री एकलिंग तसेंच, यांजवर प्रसन्न आहेत. शिखरशिंगणापुरास राजांनीं अति कष्टें व श्रमसायासें तलाव उत्तम बांधला आहे. त्याची वास्तुशांति परवांचे दिनींच जाहली. श्रीशंकरकृपेनें येथें डोंगराचे माथ्यावरही पाणी भरपूर व उत्कृष्ट लागलें आहे. आजपर्यंत पाणी यात्रेकरूंस खालून आणावें लागत असे. तो ताप निवारण झाला. त्यावरून राजे यांची वारकरी

लोकीं फार बोलबाला झाली आहे. त्यांच्या मुखें सर्वत्र राजे यांस धन्योद्धार निघत आहेत. प्रत्यक्ष गंगाच शंकरास भेटण्यास आली. राजांची पूर्वपुण्याई व इहजन्मींचें क्रियमाण जबर. त्याविना अशी सिद्धि होणें नाहीं. सर्वांमुखीं असाच धन्यवाद झाला.

राजे यांस प्रत्यक्ष दृष्टांत झाला कीं, श्रीशंभुमहादेव साक्षात् कैलासनाथ, भक्तकामकल्पद्रुम, राजांस रात्रीं एकांतीं दर्शन देऊन बोलले जे, आपण तुझ्या ठिकाणीं प्रसन्न आहों. तूं माझा मोठा भक्त, वर माग. देण्यास सिद्ध असों. राजांनीं पुत्रप्राप्तीचा वर मागितला. कुलोद्धारक जगतांत कीर्ति भरील असा स्वधर्मपालक पुत्र देणें तर द्यावा ह्मणून राजांनीं विनंती केली असतां 'तथास्तु तुला पुत्र दिला. तूं मागतोस तसा पुत्र दिला. शिवाय तुझ्या वंशांत आपण स्वतः अवतार घेऊन भूमिभार नाहींसा करूं' असें ह्मणून श्रीशंकर अंतर्धान पावले.

आपण लवकर यावें अशी राजांची इच्छा आहे. त्यांचे आपणांस फार फार नमस्कार त्यांनीं लिहावयास सांगितले आहेत. आह्मी सर्व आपली मार्गप्रतीक्षा करून आहोंत.

**ताजाकलम**—श्री मत्प्रतापसिंह महाराणाजींस राजांचें कुशल कळवून त्यांचे अनेक नमस्कार सांगावे, व आपले स्वधर्मपालनाचे कामीं होत असलेले भगीरथ प्रयत्न ऐकून आह्मांला फार आनंद होत आहे. आपणांस श्रीएकलिंगांनीं यश द्यावें अशी आमची त्याच्यापायीं नित्य प्रार्थना आहे असेंही सांगण्यास राजे यांनीं सांगितलें आहे. कळावें, लोभ असावा हे विनंती."

**भास्कर.**

---

## प्रकरण १७ वें.

श्रीशंभुमहादेवाचा सुतप्राप्तीविषयीं झालेला वर मनास घेऊन मालोजी, दिपाबाई वगैरे सर्व माणसांसह, परत वेरुळास येतांनांही, रमा व शंभू यांचा, त्याचप्रमाणें सर्जेरावाचा कांहीं तरी शोध लागेल अशा आशेनें फार सावकाश व अगदीं लहान लहान मजला करीत होता. तथापि कांहींएक शोध ह्मणून लागेना, त्यामुळें त्या सर्वांचेंच मन फार विरस झालें होतें.

एक दिवस ह्या मंडळीचा मुक्काम भीमेच्या तीरावर असतां मालोजीस एक पाठमोरा संन्यासी दिसला. तेव्हां त्याचें दर्शन करण्याच्या इरादानें जों तो समोर जाऊन उभा राहिला तों तो संन्याशी एकदम चपापला; व त्याचा चेहरा पाहतांच मालोजींची अवस्था तशीच चमत्कारिक झाली. त्यानें त्याला साष्टांग नमस्कार तर घातलाच, तथापि ह्या संन्याशाची मुद्रा आपल्या चांगल्या परिचयाची आहे असें त्याकडे न्याहाळून पाहतांच त्याला वाटलें. संन्याशानें नारायणनामोच्चारानें आशीर्वादाचा अभिनय केला, आणि मालोजीनें 'महाराज या दासास कांहीं तरी आज्ञा व्हावी' अशी त्यास विनंती केली. मग दोघेही चित्रासारखे एकमेकांकडे पाहत क्षणभर उभे राहिले व एकसमयावच्छेदानें दोघांनींही 'कोण? भोंसलेराजे?' 'कोण? रामभट्टबावा?' अशी परस्परांच्या ओळखी पटल्याचीं दर्शक वाक्यें उच्चारिलीं. झालें, ओळख पटली. मग दोघांनींही एकमेकांची हकीकत विचारून घेतली. त्यांत मालोजीराजाला प्रवासांत ज्याप्रमाणें रामभट्ट व सीताबाई यांजवर प्रसंग आला

होता, तसाच प्रसंग फिरून येऊन तीं नवराबायको व चार वर्षांचा मुलगा यांची ताटातूट झाली, आणि बायको व मुलगा यांची आणि आपली फिरून या जगीं गांठ पडण्याची निराशा होऊन आणि या विपरीत काळांत गृहस्थाश्रमावर येणाऱ्या सहस्रशः असह्य आपदांना कंटाळून रामभट्टांनीं ही संन्यासदीक्षा घेतली होती, अशी हकीकत कळली. मालोजीनें शंभू, रमा व सर्जेरावांची हकीकत सांगून हैबतराव व रामभट्ट यांसह शंभू वगैरेंच्या शोधार्थ आपण कसे व किती उपाय योजिले वगैरे सर्व मजकूर रामभट्टांस सांगितला. रामभट्टांनींही हैबतरावाबद्दल एक मोठा सुस्कारा टाकून असें सांगितलें कीं, या दुसऱ्या प्रसंगींही त्या बिचाऱ्यानें आमच्याकरितां जिवावर उदार होऊन श्रमसायास केले. परंतु त्याची काय वाट झाली हें मात्र आपल्याच्यानें कांहींच सांगवत नाहीं. त्या दुष्टांनीं देवाच्या मूर्तींचाही विध्वंस केला. अशी ही हकीकत सांगतांनां मालोजी व रामभट्ट या दोघांनाही गहिंवर आला. त्यांच्या डोळ्यांतून अश्रू आले. मालोजीला अनावर क्रोधही आला होता, परंतु तो सर्व गिळून काळाकडे नजर देऊन त्यानें यतींचें सांत्वन केलें आणि त्यांस शिखरशिंगणापुरास कायम मठ करून गंगथडी व भीमथडी प्रांतांतच त्यांनीं राहवें ह्मणून विनंती केली. ती त्या संन्याशानें मान्य केली, व मालोजीनें शिखरावर त्यांची सर्व व्यवस्था करण्याची हमी घेतली. तथापि त्यांनीं ही दीक्षा घेण्यांत फार उतावीळपणा केला; कदाचित् दयाघन परमेश्वरानें सीताबाईस सपुत्र कोठें तरी सुरक्षित ठेविलें नसेल कशावरून? आणि तीं फिरून रामभट्टांस दृष्टीसही पडण्यास कांहीं हरकत नाहीं;

वगैरे प्रकारांनीं मालोजीनें रामभट्टांशीं बराच युक्तिवाद केला. रामभट्टांनींही 'आपण संन्यास घेतला तोही त्या ईश्वराच्याच इच्छेनें होय, नाहीं तर आपली स्वतंत्र सत्ता थोडीच आहे वाटेल तसें वागण्याची?' असें त्यास प्रत्युत्तर दिलें. असो! एकदोन दिवस मालोजी बरोबरच दूरदुरून प्रवास करून सुखदु:खाच्या गोष्टी बोलून मालोजीच्या इच्छेप्रमाणें कायमचा मठ शिंगणापुरास करण्याचें कबूल करून वैराग्यानंदस्वामींनीं आपला मार्ग अलग सुधारला. मालोजीचा प्रवास धीरेधीरे चालूच होता. शेवटीं वळिवाचा मोसम संपून मृगारंभ झाल्यामुळें, थोडाफार पावसाचा त्रासही सोसण्याची पाळी येऊं लागली, तेव्हां जलदी घर गांठण्याच्या इराद्यानें मालोजीनें सरळ रस्ता काढण्याचें मनांत आणलें. गंगथडी प्रांतांत गोदातीरानें यांचा प्रवास चालला असतां एक दिवस पावसानें एक घटकाभरच पण असें चोपलें कीं कांहीं सोयच नाहीं. त्यामुळें दिपाबाईची प्रकृति बिघडली आणि चांगला आठ दिवसांचा मुक्काम गोदातीरीं करणें भाग पडलें.

सुप्रभातीं उठून स्नानध्यान वगैरे आटोपण्याची मालोजीस संवयच होती. त्यांत अलीकडे त्याला पार्थिवपूजा असे, आणि यांच्या मुक्कामापासून गोदा सरासरी अर्धा मैलच होती. वनश्री उत्तम प्रकारची. मालोजीला तिची आवड. गर्द रान असल्यानें शिकारीचाही चांगलाच लग्गा मिळण्याचा संभव, आणि इतर करमणुकीचा अभाव. मग काय विचारतां? सकाळसंध्याकाळ बराच वेळ मालोजीची स्वारी गोदातीरीं स्नानादिकास व पलीकडे शिकार वगैरेस जाऊं लागली. गोदेच्याच तीरीं हे स्नान

करीत असत. तेथून अर्धकोशावर झाडीच्या तोंडाशीं एक जुनें हेमाडपंती शिवालय होतें, तेथेंही सकाळसंध्याकाळ दर्शनास जाण्याचा मालोजीचा परिपाठ होता.

एके दिवशीं संध्याकाळीं शिकारीहून परत फिरणार तोंच पाऊस कोसळण्यास सुरवात झाली, तेव्हां त्याची मोठी कुचंबणी झाली. बरोबरच्या भाडोत्री रामोशांनीं 'जवळच एका ओढ्याच्या दरडीवर कोणाचींशीं चार झोंपडीं आहेत ह्मणून बातमी दिली; आणि ही शिकारी मंडळी कांहीं वेळ त्या झोंपड्यांच्या आश्रयास गेली. तेथें जातात तों एक काळा ह्मातारा इसम झोंपड्यांचीं फाटकें लावून घेण्यांत गुंतला होता. त्याची मालोजीनें विनवणी केली कीं, पाऊस थांबेपर्यंत आह्मांला जर एखाद्या झोंपडींत थोडी निवाऱ्याची जागा द्याल तर मोठी मेहेरबानी होईल, आणि आह्मी तुमचे उपकार अगदींच कोरडे ठेवणार नाहीं. त्या ह्मातान्यानें कांहींएक कांकूं न करितां एकदम गोष्ट कबूल केली आणि मोठ्या लीनतेनें एका झोंपडीचें झडप उघडून 'महाराज या,' ह्मणून मालोजीस जागा दिली, आणि दुसरी एक झोंपडी उघडून इतर रामोशांस जागा दिली.

मालोजीला ज्या झोंपडींत जागा मिळाली तेथें एक मिणमिणीत दिवा जळत होता. एक जातें आणि चार गाडगीं होतीं. दोन बायका, वर्णानें मात्र काळ्या परंतु अगदीं रेखलेल्या अवयवाच्या अशा, आणि दोन मुलें, एक चारपांच महिन्यांचें आणि दुसरें तितक्याच वर्षांचें, अशीं चार माणसें होतीं. मालोजीरावांची आजची शिकार वाघाच्या दोन लहान पोरांची होती. मालोजीराव आंत एका

लव्हाळ्याच्या हांतरीवर बसला. तीं दोन्ही वाघाचीं पोरें त्यानें झोंपडीच्या एका कळकास घट्ट बांधलीं; तों तो ह्मातारा आंत आला आणि त्यानें एका परळांत धगधगीत निखारे घालून तें मालोजीपुढें ठेविलें; व आपण लांब झोंपडीच्या दोन भागांतील मधल्या कुडाजवळ बसला होता. बायका मालोजी आंत येतांच आंतल्या अंगास गेल्या होत्या. पांच-एक वर्षांचा एक तरतरीत मुलगा मात्र येथें आवडाव करीत होता. त्यानें तीं वाघाचीं पिलें पाहून तर ' आई ! आई ! हीं बघ कसलीं पिवळीं मांजरें तीं ! बाबा बाबा ! हीं कोणीं हो आणलीं ?" ह्मणून दुरूनच अशी गर्जना करून चौकशी चालविली कीं विचारूं नका. बाबा ( तो ह्मातारा ) 'गप—गप, चूप राहा' ह्मणून त्याला दटावूं लागला. त्या मुलाची ती अस्खलित शुद्ध वाणी ऐकून मालोजीला तर फारच अचंबा वाटला. त्यानें त्या मुलास ममतेनें आपल्याजवळ बोलाविलें. ह्मातारा बाबा त्याला डोळ्यानें दाबीत होता. त्यामुळें त्या मुलाची अगदीं घाबरगुंडी झाली. शेवटीं त्याची आई बाहेर आली आणि तिनें त्या मुलाच्या दंडाला धरून त्याला ओढीत आंत नेलें. तरी तो मुलगा आंत न राहतां लगेच बाहेर आला, आणि फिरून त्यानें आपली आवडाव चालू केली.

आपल्यापुढें दिसणारीं माणसें जशीं दिसतात तशीं नसून कांहीं तरी गुप्त प्रकार आहे, अशी मालोजीची तर अगदीं खात्री झाली. शेवटीं स्वतः उठून मालोजीनें त्या मुलाला तर जवळ घेतलेंच; आणि विस्तव जरा फुंकून जास्त तेजदार केला. दिव्याची वात सारली, तों ह्माता-ऱ्यानें आपलें तोंड फिराविलें. तथापि मालोजीनें त्या मुला-

शींच गोष्टी चालविल्या आणि आपल्या मनाची खात्री करून घेतली कीं, मुलगा सुवर्णबीजाचा आहे.

असो ! वाचकांना उगाच बुचकळ्यांत ठेवण्यांत कांहीं अर्थ नाहीं. हीं झोपडींतील माणसें हैबतराव, रमा वगैरेच होतीं. मालोजीनें हिकमतीनें प्रश्नोत्तरें करून या ह्मातान्यास शेवटीं गौप्यस्फोट करावयास लावलें, आणि त्यांनीं आपले वेष फिरून पालटून आपणास येऊन कसें मिळावें याचा संकेत ठरवून ठेवला; व पाऊस थांबतांच सर्व मंडळीसह तेथून सरळ आपल्या मुक्कामाची वाट धरली. रमेस या गोष्टीचा किती आनंद झाला असेल बरें ?

आपल्या हरवलेल्या माणसांपैकीं बऱ्याच माणसांचा शोध लागून ज्यांचा शोध लागला नाहीं त्याजबद्दलही बरीचशी हकीकत कळली ह्मणून पुष्कळ समाधान वाटून रमा, हैबतराव, सीताबाई व दोन्ही मुलें यांसह मालोजीचा पुढील प्रवास आनंदानें होऊन तो फिरून सिंधखेडास येऊन पोंचला.

---

## प्रकरण १८ वें.

घरीं येतांच मालोजीनें पहिलें काम हें केलें कीं, सेनापति जाधवरावांची गांठ घेऊन त्यांच्या शिफारसपत्रासह सर्जेरावाबद्दल एक, शंभूच्या तर्फेनें निंबाळकरांकडून एक, आणि पुंड्यांच्या शिफारसपत्रासह सीताबाईकडून आपल्यास पोंचलेल्या त्रासाबद्दल एक, असे तीन फिर्यादी अर्ज सुलतान अहमद दुसरा याच्या दरबारास केले. तसेंच सुलतानाच्या पदरीं, दुसरे जे अनेक मराठे

सरदार होते त्यांच्या गांठी घेऊन, त्या प्रत्येकाकडून दरबा-
रांत ह्या बेबंदशाहीबद्दल व जुलूमजबरीबद्दल तक्रार
करण्याचें वचन घेतलें. त्याप्रमाणें दरबारांत चौकशी
चालण्याच्या वेळेस सुलतान व त्याचे वजीर वगैरेंच्या
मनावर अर्जांतील मागणीस अनुकूळ असाच संस्कार
होऊन या सर्व बाबींचा तलास लावलाच पाहिजे ह्मणून
सुलतानाच्या दरबाराचा ठराव झाला. तोंच हैबतरावाकडू-
नही मालोजीच्या सल्ल्यानें एक जंगी अर्ज येऊन पोंचला.
हैबतरावाच्या अर्जास जावळीच्या मोऱ्यांचें शिफारसपत्र
मिळविण्याची तजवीज जाधवरावांकडून मालोजीनें कर-
विली होती. हैबतरावाचा शंभू, सर्जेराव, रमा, सीताबाई
आणि रामभट्ट या सर्वांशींच चांगला संबंध पोंचत अ-
सून ह्या सर्व अर्जांचें असें कांहीं पाठबळ एकमेकांस
आपोआपच पोंचत होतें कीं कांहीं विलक्षणच. शेवटीं या
सर्व गोष्टींचा कोण तलास लावतो ह्मणून जेव्हां सरदार-
मंडळीस आव्हान झालें तेव्हां जाधवराव वगैरेनीं मालोजीच्या
विनंतीवरून हैबतरावाचेंच नांव सुचविलें. मालोजीनेंही
आपल्या इच्छेप्रमाणें हैबतरावाचीच या कामावर नेमणूक
झाल्यास काय काय अटींवर त्यानें त्या कामास हात घाल-
ण्यास तयार व्हावें, यांचें दर्शक असें एक विनंतिपत्र
अगोदरच आवजी गोविंदकडून मोठ्या विचारानें तयार
करून ठेविलें होतें. त्यांत त्यानें 'आपल्या मदतीस २५
पासून ५० पर्यंत आपल्या स्वतःच्या निवडीचे हत्यारबंद
लोक असून सरकारी डांकेचा हवा तसा उपयोग करितां
यावा आणि वाटेल तेथें शिरण्यास परवानगीदाखल
सरकारी सहीशिक्क्याचीं आज्ञापत्रें असावीं; शिवाय प्रसंगीं

समोरासमोर एखाददुसरा खून झाल्यास तोही माफ असावा, त्याचप्रमाणें शंभुराव व सर्जेराव यांनीं स्वसंरक्षणार्थ अथवा आपणांस विनाकारण प्राप्त झालेल्या प्रतिबंधांतून मुक्त होण्याच्या प्रयत्नांत केलेल्या खुनापर्यंतच्या अपराधांची माफी असावी, आणि शेवटीं या कामीं लागणारा खर्च सरकारांतून मिळावा,' अशा मुख्य अटी घातल्या होत्या, आणि या अटींवर जर सरकारचें काम आपल्या हातून झालें नाहीं तर सरकारचा सर्व खर्च परत करूं, अशाबद्दल मालोजीराव व पुंडे यांची जामिनकी घातली होती.

अर्जाचा यांच्या मनाप्रमाणेंच निकाल झाला आणि मालोजीनें हैबतरावास योग्य मसलत देऊन आपला मुलगा व जांवई यांच्या शोधार्थ पाठवून दिलें; व वाटेल तेव्हां 'तुमचा निरोप पोंचतांच मी तुह्मांस मदत करण्यास स्वतः येईन, ह्मणून वचन देऊन त्यानें त्यास एका मुक्कामापर्यंत पोंचतें केलें. तेथें पूर्वसंकेतानुरूप रामजी वगैरे त्यास येऊन मिळाले आणि तें एक कार्य चांगलेंच लागीं लागलें. 'जिवंत असतील तर खात्रीनें सर्वांस हुडकून काढूंच काढूं' अशी त्यांस हुरूप होती; आणि रामजी वगैरेंना त्यांच्या आतांपर्यंतच्या प्रयत्नानें ते जीवंत असून अमुक ठिकाणीं असावे असा बराच सुगावा लागला होता.

या अर्जाच्या खटपटींतून मालोजी मोकळा होत आहे, तोंच आपली सद्भार्या गरोदर असून तिला डोहाळे होऊं लागल्याचें त्याला समजलें व त्याच्या आनंदांत भर पडली. रमेचा मुलगा आतां चांगला रांगूंखेळूं लागला होता; आणि आई, बाबा वगैरे कांहीं शब्दही उच्चारूं लागला होता. तथापि त्याचें तें खेळणें वगैरे पाहून तिला जितकें कौतुक

वाटत असे तितकेंच आपला नवरा हें कौतुक पाहण्यास नाहीं याबद्दल दुःख होत असे. सीताबाईस अजून तिच्या नवऱ्यानें संन्यास घेतल्याची बातमी मालोजीरावानें दिली नव्हती. तथापि तिचें विरहदुःख तिला आतां इतकें अनावर झालें होतें कीं, ती त्यांतच थोड्या दिवसांत मरून जाईल असें दिसत होतें. ह्मणून तिला तिच्या नवऱ्याची हकीकत आतां कळविलीच पाहिजे, असें वाटून मालोजीनें तिला ती सर्व सांगितली व इतर सर्व गोष्टींचा शोध लागे-पर्यंत तिनें ती तशीच गुप्त ठेवावी, असेंही तिला सांगून ठेविलें. तिच्या मुलग्यास—त्याचें नांव कुश होतें—त्यानें भास्करभट्टांच्या ताब्यांत दिलें आणि तिचीही सोय त्यां-च्याच घरांत करून या जगीं आतां तिला शक्य तितक्या सुखाची प्राप्ती करून दिली.

इकडे दिपाबाईचा गर्भ दिवसामासा वाढीस लागून स्वतः दिपाबाई बरीच अशक्त दिसूं लागली. तोंडावर एक प्रकारचें त्या गर्भाचें विलक्षण तेज झळकत होतें; तरी तिची मान वर निघून उसाच्या वाढ्यासारखी निस्तेज दिसत होती. तिची त्या वेळची स्थिति आणि तिचे डोहाळेही फार कौतुकाचे असत. एक दिवस मालोजी सहज तिला 'तुझी काय इच्छा आहे? तुला कोणती वस्तु हवीशी वाटते? जें तुला वाटत असेल तें सांग' ह्मणून तिला विचारूं लागला. तों लाजून तिनें मान खालीं घा-तली. तिच्या मनांत पुष्कळ बोलावेंसें वाटे. परंतु भीति ही कीं, आपला प्रियकर आपणांस काय ह्मणेल? पहिल्याच प्रसंगाला पुरुषाजवळ आपले डोहाळे सांगावयाचे ह्मणजे ती बायकांना मोठी लज्जाच असते. तिची अशी स्थिति पाहून

मालोजीनें फिरून तिला ह्मटलें कीं 'सांग, सांग, तुला जें वाटत असेल तें सांग. आतां लाजण्याचें किंवा भिण्याचें काय कारण?' 'कुमारिका आपलें मनोगत उघड करून सांगण्यास स्वतंत्र नसतात ह्मणून जें तूं त्या वावराहिरबागेंत ह्मटलें होतेंस तशी कांहीं स्थिति आतां नाहींना? तेव्हां विशेषच लाजून आणि जरा खोटाच रागाचाही त्यांतल्या त्यांत आविर्भाव आणून दिपा ह्मणाली 'पुरें मेलें. माझ्या नाहीं लक्षांत मीं काय तेव्हां ह्मटलें होतें तें. आणि आतां कशाला त्या वेळचें तें उकरून काढून एवढें हिणवायाला हवें होतें? पुरुषांचा डावच कठिण मोठा. ह्मणूनच तर मी भित्यें कीं, हो आपण काहीं सांगितलें नि तें इकडे पटलें नाहीं, तर नकोग बाई, मला तें फिरून फिरून तेंच तेंच हिणवून घेणें.' ती रागावलीशी पाहून व तिच्या मनांतील खरा भाव जाणून त्यानें तिची समजूत घातली आणि खरोखरच आपण मनापासून तिचे डोहाळे विचारीत आहों अशी तिची खात्री केली.

दिपाबाईचे डोहाळे ह्मणजे काय विचारतां? कोठें लढाईच पाहण्याची इच्छा तर कोठें दरबारांत नवरा सिंहासनावर बसलेला पाहण्याची इच्छा, अशा प्रकारचे फार कठिण होते. मी अमकें खाईन, तमकें खाईन, यापैकीं एकही डोहाळा होत नव्हता. दरबार, लढाई, राज्य करणें, किल्ले बांधणें, अशीं सर्व, सध्यां तरी अगदीं अशक्य, असलीं तिची मनोगतें असत. सारांश काय तिचे सर्व डोहाळे जेव्हां मालोजीनें ऐकिले तेव्हां त्याला केवळ कौतुकापलीकडे कांहींएक वाटलें नाहीं. तथापि डोहाळ्यावरून मुलाची परीक्षा या न्यायानें आपला मुलगा मोठा पराक्रमी होणार अशी मात्र त्याची खात्री झाली. त्यानें आपण तुझ्या सर्व

इच्छा पूर्ण करूं ह्मणून तिला वचन दिलें, आणि खरो-खरच आपल्या वीरवंशज वीरपत्नीचे ते डोहाळे ऐकून मालोजीची महत्वाकांक्षा फारच जोरावली. त्यानें निश्चय केला कीं, हर प्रयत्नानें आणि पडेल तें साहस शिरावर घेऊन आपल्या श्रीशंभुवरप्रसादानें होणाऱ्या पुत्रास आपल्या डोळ्यांदेखत चांगला जहागिरदार बनवून सोडाव-याचा, ह्मणजे आपणास जशा जगांत लहानपणापासून क्षुल्लक कामांतही अनेक अडचणी सोसाव्या लागल्या, तशा त्यास न लागून तो आपल्या कर्तबगारीनें आणि अनुकूलतेनें या देशांत आपल्या कुळाचा बडेजाव वाढवून चांगलाच उद्धार करील. अस्तु. हें डोहाळ्यांचें आख्यान आतां येथें पुरें करूं.

---

## प्रकरण १९ वें.

गोदातीरीं इमामवाडी ह्मणून एक लहानशी गढी होती. तेथें शंभूस अटकेंत ठेवलें होतें. अटकेंत असतांनां शंभनें प्रसंगावर नजर देऊन असें वर्तन ठेवलें कीं त्या योगानें पाहरेकऱ्यांचा हवालदार रुस्तुमजमान याची शंभूवर मोठी बहाल मर्जी असे. या रुस्तुमजमानानें एक मराठ्याची पोरगी धरून आणली होती व तो तिचें मन वळविण्या-करितां फार धडपडत होता. शेवटीं त्यानें शंभूस 'तूं जर माझें येवढें काम करशील तर मी तुला सोडून देईन.' असें वचन देऊन आपण धरून आणलेल्या पाखरास बोलतें करण्याच्या कामीं त्याची नेमणूक केली. शंभूनेंही साधल्यास एका अबलेला या खानाच्या हातून सोडविण्याची व त्या

बरोबरच आपलीही तुरुंगांतून सुटका करून घेण्याची संधी फुकट दवडली नाहीं. 'खानसाहेब, मी फक्त आपल्यास तिचा कबूलजबाब मात्र आपणासमक्ष मिळवून देईन व लगेच आपण माझी सुटका केली पाहिजे' अशी शंभूनें त्यास अट सांगितली व खानसाहेबांस ती मान्य झाली.

या मोहक कोकिलेचें नांव अंबा असें होतें. शंभूनें प्रथम तिची सर्व हकीकत मोठ्या चातुर्यानें काढून घेतली. त्यांत त्याची खात्री झाली कीं 'ही सुंदरी खरोखरच मोठ्या कुलीन घराण्यांतील असून आपणावर जसा लहानपणींच प्रसंग आला होता, तसाच इजवर येऊन ही या शिखानष्टाच्या हातांत सांपडली आहे.'

त्यानें तिला तिच्या सुटकेची आशा दाखवून तिची आपल्या वर्तनानें पक्की खात्री पटविली कीं, हा ह्मणतों तसें करील खास. त्यामुळें प्रथम जी तिनें आपली हकीकत जरा मोघमच सांगितली होती, ती आतां पुरती सांगितली. त्यावरून शृंगारपुरच्या सुर्वे राजघराण्यांतील हें रत्न होतें असें कळलें. शंभूनेंही आपली सविस्तर हकीकत तिला सांगितली. तेव्हां हाही आपल्याप्रमाणेंच शिरके या नांवाच्या राजघराण्यांतील पुरुष असून मोठा शूर व सद्गुणी आहे असें तिलाही आढळून आलें. तेव्हांपासून या दोघांचीं मनें संगतीच्या प्रभावानें एकमेकांच्या अंतर्गत गुणांस मोहित होऊन तीं एकमेकांच्या आजन्म संगतीविषयीं कामुक झालीं. सुटका कशी व्हावी?—ह्याला त्यांना कांहीं तोड सुचेना.

इकडे रामजी वगैरेंना या गढींत शंभू किंवा सर्जेराव यांपैकीं कोणी तरी आहे असा चांगला सुगावा लागला होता.

त्यामुळें रामजी फकिराच्या वेषानें त्या गढींत शिरला व रुस्तुमजमानास त्यानें आपल्या ढोंगधुतान्यानें चांगलेंच नादीं लावलें, व त्याचें अंबेबद्दलचें गौप्य त्याजकडून काढून घेतलें. अर्थातच शंभूची माहिती त्याला मिळाली. त्यानें खानास 'आपण त्या गुलजार गुलनारीची तुला प्राप्ति करून देतों, मात्र आपणास एकदोन वेळां तिच्याशीं चार दोन घटका एकांत सांपडला पाहिजे, असें सांगून त्या मिषानें दोघांचीही त्यानें गांठ घेतली व पुढील संकेत ठरविला. तो असा कीं, खानसाहेबास 'अमुक दिवशीं आपण या, आपली इच्छा मी पुरवीन, असें अंबेनें वचन द्यावयाचें व अगदीं आयत्या वेळेस तो खुषींत असतांनां शंभूच्या सुटकेची मागणी करावयाची आणि त्याप्रमाणें त्यानें त्यांस चोरवाटेनें सोडून दिलें ह्मणजे त्याला पुष्कळशा शराबांत गुंगीचें औषध पाजून तो पुरा झिंगला ह्मणजे त्याचें शस्त्र काढून घ्यावयाचें व त्या महालास कुलूप लावून आपण बाहेर यावयाचें. शंभूनें बाहेर पडतांच फिरून त्याच वाटेनें पंचवीस हत्यारबंद शिपायांसह गढींत शिरून एकदम हवालदारास कैद करावें आणि सर्जेरावांचा शोधही त्यासच विचारावयाचा. त्याला तो माहीत असलाच पाहिजे.

इकडे लक्ष्मणभट्टांनीं प्रतापसिंगाचें दर्शन घेऊन त्यांस आशीर्वाद देऊन आपलें राजस्थानांत येण्याचें सार्थक केलें. प्रतापसिंगानें अकबरशहाची आपल्या सत्वधीरतेनें आणि अतुल शौर्यानें चांगलीच खोडकी मोडली होती, व फिरून त्याचें नशीब उदयास येत होतें. त्यानें चितोडखेरीज बहुतेक मेवाड फिरून प्रत्येक तसू तसू जागेकरितां लढून जिंकला होता, व अकबराच्याही

मनानें असल्या प्रतापी शत्रूच्या फिरून वाटेस जावयाचें नाहीं असा बहुतेक निश्चयच केला होता. तथापि त्याचें लक्ष्य अलीकडे दक्षिणविजयार्थ फार धडपडत असून तो थोडक्यांत दक्षिणेंत स्वारी करील असा सुमार असल्यामुळें लक्ष्मणभट्टांसही आतां आपल्या यजमानांपासून दूर राहणें नीट नाहीं असें वाटून त्यांनीं घरचा मार्ग सुधारला होता.

तिकडे रामभट्टजी ( वैराग्यानंद संन्यासी ) आपली काशीयात्रा संपवून वचनाप्रमाणें फिरून मालोजीच्या भेटीस यावयास निघाले होते. तों इकडे मालोजीच्या घरीं दिपाबाईचे दिवस भरून तिचा प्रसूतिकाळ अगदीं नजीक ठेपला होता. रमाबाईस सर्जेरावाचा वियोग असह्य होऊन ती अगदीं खंगली होती. तिचा मालोजीजवळ असा हट्ट चालला होता कीं 'आपण स्वतः पुरुषाच्या वेषानें आपल्या नवऱ्याचा शोध करण्यास जावें.' अगदीं निरुपाय झाला तेव्हां मालोजीस तिचें ह्मणणें मान्य करावें लागलें. तथापि त्यानें तिला उगाच कोठें तरी न दवडतां हैबतरावा-कडेसें पोंचतें करण्याची व्यवस्था केली.

रमा गेली आणि आठदहा दिवसांनीं दिपाबाई शुभ वेळीं बाळंतीण झाली. मुलगा झाला. सर्वांस अत्यानंद होऊन मालोजीनें पुष्कळ दानधर्म केला; व साखरा वांट-ल्या. परंतु हा आनंद सुखानें उपभोगण्यास त्याला घरीं राहतांच आलें नाहीं. तिसरेच दिवशीं, अहमदनगरावर मोंगल सैन्य चाल करून येत असल्यामुळें त्याच्या प्रती-कारार्थ होत असणाऱ्या सैन्याच्या जमवाजमवींत, मालोजी-रावांसही देखतहुकूम चाकरीवर हजर होण्याबद्दल खलिता आला, आणि त्याप्रमाणें त्यास लढाईवर जावें लागलें.

लढाई फारच मातबर झाली. मोंगल सैन्याचा जमाव मोठा आणि तोफा वगैरे सामान फार संगीन. शहराचा तट पडून शत्रूची सरशी होण्याचे प्रसंग वारंवार येऊं लागले. जाधवरावांनीं आपल्याकडून शिकस्त केली, परंतु शत्रू आवरेना. स्वतः सुलतान लढाई पाहत होता. जाधवरावांस मागेंही बरेच वेळां त्याचप्रमाणें याही वेळीं मालोजीच्या शौर्याची तारीफ करण्याचे प्रसंग येऊन त्यांनीं आयत्या वेळीं ९०।१०० लोक देऊन त्याच्या कर्तबगारीची पुष्कळ परीक्षा घेतली. शेवटीं शत्रूवर उघड चाल करून जाण्याचा प्रसंग आला. त्या वेळीं त्यांनीं २०० लोक त्याच्या हाताखालीं देऊन त्याला अगदीं शत्रूच्या तोंडाशीं भिडण्याचा हुकूम केला. तरीही तो वीर मुळींच न डगमगतां दोन्हीं बाजूस त्याचे लोक पांचपांच दहादहा मरून पडत होते तरी शत्रूची फळी फोडून आपल्या समशेरीस शेंकडो बळी घेत पार झाला, आणि फिरून मागून शत्रूच्या बाजूवर हल्ला करून त्यांना दे माय धरणीठाय करावयास लावून त्या तुकडीचें थोरलें निशाण छिनावून परत आपल्या लोकांत येऊन मिसळला. इकडे त्याच्या उदाहरणानें इतरही लोकांनीं शत्रूवर जबरदस्त मारा करून हल्ला मागें हटविला; व मोंगलांस हार खाऊन परत फिरावें लागलें.

याप्रमाणें पुत्रलाभ, कीर्तिलाभ आणि भावी उदयाची आशा, अशा तिहींचा लाभ मालोजीस झाला.

---

## प्रकरण २० वें.



हैबतराव, रामजी वगैरेच्या प्रयत्नास यश येऊन रमा व सर्जेराव यांची भेट झाली. शंभूस अंबेसारखी उत्तम भार्या प्राप्त झाली. रामभट्ट व सीताबाई यांची भेट झाली. रामभट्टजीच्या मुलाचें मौंजीबंधन होऊन त्याला मालोजीनें शंभुमहादेवाची पूजा सांगितली आणि त्या कुटुंबाचें स्वास्थ्य केलें. लक्ष्मणभट्ट फिरून आपल्या यजमानांस व आपल्या मुलामाणसांस येऊन भेटले. दिपाबाईनें पूर्वी कधीं 'आपणास मुलगा झाला तर,' इतर दहा तसाच तेथील शहासरीफाच्या पीरासही नवस केला होता कीं 'त्या मुलग्यास तुझें नांव ठेवीन.' त्याप्रमाणें मुलाचें नांव शहाजी ठेवण्यांत आलें होतें. तो आतां चांगला खेळूंबागडूं लागला होता. जाधवरावास मूल नव्हतें. मालोजीच्या मुलाचा त्याला विशेष लळा लागला होता. शहाजी बहुतकरून नेहमीं दिवसाचा जाधवरावांकडेच असे. तो फार सुंदर होता. पाहतांक्षणीं पटकन उचलून मुका घ्यावा असेंच सर्वांना वाटावें, असें त्याचें कांहीं लोकोत्तर सौंदर्य होतें. जाधवरावाच्या राण्याही त्याचें फार कौतुक करीत असत. त्याला उंचीउंची व पोषाख दागदागिने घालून नटवीत असत. सर्वस्वी तो जाधवांच्या आनंदार्थच जणुं जन्मला होता. इकडे मालोजीच्या घरीं रमेच्या मुलाचे असेच लाड होत असत. असें चाललें आहे तों जाधवरावास एक अत्यंत सुंदर केवळ नक्षत्रासारखी अशी एक मुलगी झाली. तथापि शहाजीच्या लाडांत कांहींएक कमी झालें नाहीं. तीही खेळंरांगं लागतांच

तो या दोघांनाही बरोबरच वागवूं लागला. दरबारांत वगैरेसुद्धां दोघांस घेऊन जावयाचा. याप्रमाणें एके ठिकाणीं खेळणारीं व बागडणारीं तीं दोन्ही मुलें एकमेकांस फार आवडतीं झालीं. त्यांना एकटें करमेनासेंच झालें. साहजिकच आहे, ही बाळपणाची निर्हेतुक मैत्री त्यांच्यामध्यें उत्पन्न झाली. असें होतांहोतां शहाजी व जिजाबाई (जाधवरावाच्या मुलीचें नांव) हीं अनुक्रमें ५ व ३ वर्षांचीं झाली; तों त्या सालीं शिमग्यांतील रंगपंचमीच्या सणाच्या दिवशीं या दोन्हीं मुलांचा जन्माचा संबंध जडविण्याची ब्रह्मदेवाची इच्छा चमत्कारिक प्रकारानें दिसून आली.

जाधवरावाच्या वाड्यांत रंगपंचमीचा दरबार होता. सर्व सरदार मानकरी वगैरे लोक हजर होते. एकंदर समारंभ प्रेक्षणीय असून सभा घनदाट भरली होती. मंडळी नाचरंगांत अगदीं गुंग होऊन गेली होती. गुलालबुक्याचीं ताटें शीग लावून भरून ठेविलीं होतीं. फुलांचे गजरे अनेक रुप्याच्या ताटांतून ठेविले होते. जाधवरावाच्या शेजारींच शहाजी, व दिपाबाई हीं बसलीं होतीं. केव्हां मांडीवर, केव्हां खालीं याप्रमाणें तीं बसत असत. एकमेकांचे मुके घेत, एकमेकांच्या अंगावर फुलें घालीत, गुलाल उधळीत, बुका उधळीत, याप्रमाणें दोघेंही जाधवरावाच्या मांडीवर बसून खेळत असतां जाधवरावास फार कौतुक वाटलें; व अत्यानंद झाला. त्या आनंदाच्या भरांत ‘ जिजाबाई ’ सारखें कन्यारत्न श्रीनें पैदा केलें, तीस वर चित्तायोग्य शहाजी राजे ( आहेत ). हें मूल बहूत उत्तम आहे. ( याचा व जिजेचा विवाह ) घडून आल्यास उत्तम असें, स्वाभाविकपणें सभेंत बोलूं लागले. तों पाठीशीं मालोजी व

विठूजी भोंसले यांनीं ती गोष्ट ऐकिली. तेच समयीं उभयतां उभे राहून बोलले कीं, ' आजपासून जाधवराव आमचे व्याही झाले. थोर लोक एकदां सभेंत बोलल्यावर मागें सरणार नाहींत.' असें मोठ्यानें सर्व सभा नाइकांस सांगून त्यांस साक्षी ठेविलें. जाधवरावांनीं यावर कांहीं उत्तर केलें नाहीं. सहज बोलून विचारीं पडले.

खेळ संपल्यावर जाधवराव महालांत गेले. नित्याप्रमाणें शहाजीस महालांत न नेतां एकव्या जिजाबाईस मात्र घेऊन गेले. महालांत सभेंतील वर्तमान कळून जाधवराव व राण्या यांचा कलह माजला. पट्टराणी जिजाबाईची आई ह्माळसाबाई ह्मणाली "पाटील देशनिकाले, पोटासाठीं तुह्मांजवळ पायबारगिरी करून राहिले. आपले समतोल नव्हेत. ते कचेरींत साक्ष ठेवून गेले. तुह्मीं त्यांस झाडून टाकिलें नाहीं." त्यावर जाधवराव ह्मणाले "आह्मीं स्वाभाविकपणें बोललों. पानें, खोबरें वाटलें नाहीं. निश्चय झाला नसतांच त्यांनीं लबाडी केली. त्यांस चाकरीवरून दूर कारितों." असें बायकांचें समाधान करून दुसरे दिवशीं मालोजी व विठूजीस बुद्ध्या भोजनास बोलाविलें. त्यांनीं उत्तर दिलें कीं, 'आह्मी सोयरे झालों. आतां लग्नसमयीं भोजनास येऊं.' नंतर जाधवरावांनीं कारकुनाकडून उभयतां बंधूंचा हिशेब चुकता करून त्यांस चाकरीवरून दूर केलें, आणि सांगितलें कीं 'तुह्मी सोयरे नाहींत. पानें वांटलीं नसतां गळां पडून तुफानें कारितां. याउपर तुह्मी येथन कबिलेसुद्धां निघून जावें. एक क्षणही राहूं नये.' मालोजीनें जाधवरावासमक्ष प्रतिज्ञा केली कीं, 'जिजा शाहजीस नवरी करीन

तरच नांवाचा मालोजी भोंसला. आह्मी कुलीन कीं अकुलीन तें आपल्याला पुरतें दाखवीन. हम्मीर प्रताप यांच्या वीरवंशाचा प्रभाव पहाच आपण.'

त्यानंतर मालोजी व विठूजी भोंसले मुलेंमाणसें घेऊन पुन्हां वेरुळास आले. तेथें पाटलास भेटून पूर्वीचें घर व शेत फिरून आटोपलें; आणि तेथें राहून आपल्या मनांतील हेतू सिद्धीस नेण्याच्या तजाविजीस ते दोघेही बंधू लागले. दोनतीन वर्षें तशींच गेलीं. निंबाळकरां-कडे पत्रें गेलीं. शंभू व सर्जेराव निंबाळकरांकडून मदत ह्मणून सैन्य आणावयास रवाना झाले. निंबाळकरांसही मोठें कोडें पडलें. तथापि त्यांनीं शंभू व सर्जेराव यांस स्वतंत्र एक हजार सैन्य उभारावयास सांगून आपण सामानसुमानाचा पाठपुरावा अंतस्थ रीतीनें करण्याचा संकेत कायम केला.

इकडे मालोजी व विठूजी दोघेही शेतांत माळ्यावर राखणीस होते. माघ शुद्ध पौर्णिमेचा दिवस. विठूजीस झोंप लागली होती. मालोजी जागा होता. तों तेथें जव-ळच असलेल्या एका मोठ्या वारुळांतून चुड्यासहवर्तमान एका स्त्रीचा हात निघून त्यानें मालोजीला हालविलें. मा-लोजी तिकडे वळून पाहतो तों विद्युल्लतेप्रमाणें चमकणारी एक सुंदर स्त्री त्याच्या दृष्टीस पडली. ती साक्षात् लक्ष्मीच आदिमाता होती. मालोजीनें नमस्कार कारितांच 'या वारुळांत सर्प आहे तो माझें स्वरूप. त्यास नमस्कार करून वारूळ खणून सात कढया माल तेथें आहे तो घेणें. सर्प जाईल, त्याचे वाटे न जाणें. तुह्मांस पिढ्यान्पिढ्या राज्य दिलें. प्रसन्न आहें. अभय आहे. चित्तीं धराल तें होईल.' याप्रमाणें आज्ञा करून देवी अंतर्धान पावली.

मालोजीच्या या वेळेच्या आनंदास काय पारावार! त्यानें लगेच विठूजीस जागें केलें, आणि त्याला सर्व वर्तमान सांगून रातोरात तो माल वारुळांतून यथाविधि खणून बाहेर काढिला; आणि घरीं आणून परसांत पेंव खणून त्यांत पुरून टाकिला. हें द्रव्य हातीं आल्यावर मालोजीस पुढें हें आपल्यास पचेल कसें ह्मणून मोठी चिंता पडली. तथापि, आतां आपली प्रतिज्ञा हरतऱ्हेनें आपण शेवटास नेऊं, अशीही त्याला उमेद वाटली. त्यानें शेताची व्यवस्था लावून बायकामुलें तेथून हालविलीं, आणि त्यांस एका गुप्त ठिकाणीं ठेवून आपण श्रीगोंद्यास शेषाजी नाईक पुंडे यांच्याकडे तळ दिला, आणि तेथून त्यांच्या सल्ल्यानें सर्व कारस्थानास सुरवात केली.

---

## प्रकरण २१ वें.

मालोजी व विठूजी यांचा आणि चांभारगोंदेकर नाइकांचा संवाद होऊन असें ठरलें कीं, नाइकांनीं हजार स्वारांकरितां लागणारें सर्व सामान, घोडे, तलवारी, भाले, स्वतः खरेदी करून द्यावे. जर प्रतिज्ञा शेवटास जाऊन भोंसले घराण्याचा भाग्योदय झाला आणि त्या वंशांत राज्य संपादन झालें तर 'जोंवर राज्य तोंवर पोतदारी तुमची' अशी सनद मालोजीरावानें या कामगिरीबद्दल नाइकांस द्यावी. असें ठरून सनद लिहून मालोजीरावानें तीवर आपली सही केली; व ती सन्मानपूर्वक नाइकांच्या हवालीं केली. नंतर मंगलस्नान करून उत्तम वस्त्रें वगैरे परिधान करून, मोठ्या इतमामानें पुंडे नाइक गाडींत बसून, बरोबर मालो-

जी व विठूजी यांस घेऊन, गांवाबाहेर कर्मधर्मसंयोगानें त्याच वेळेस एक कारवान उतरला होता, त्याच्याकडे गेले. त्या कारवानापाशीं पुष्कळ उमदे घोडे होते. पैकीं मालोजीरावानें स्वतः परीक्षा करून त्यांतून निवडक एक हजार घोडे पसंत केले. नाइकांनीं त्यांची किंमत ठरवून कारवानाचा हिशोब चुकता केला. लगेच निवडक माणसांची भरती करून 'बारगीर व खास बारदार, यांची करोल जमात तयार केली. त्याचप्रमाणें कांहीं शिलेदारही तयार केले. डेरे, पालख्या, मेणे वगैरे सर्व सामान रसदींच्या गाड्यांसह अगदीं कडेकोट तयारी होतांच निंबाळकर नाइकांकडे खलिता पाठवून 'त्यांच्या कौलनामा आणून आपण (मालोजीराव) जाऊन त्यांस भेटले. कुलवर्तमान त्यांस जाहीर केलें कीं, आह्मांजवळ एक हजार स्वारांची फौज आहे. तुह्मी मदतीस दोन हजार देणें. तीन हजार स्वारांनिशीं सडे जाऊन लखूजी जाधवराव यांशीं सगाईचा दावा करितों.' निंबाळकरांनीं ती गोष्ट कबूल केली. व दोन हजार स्वार, उत्तम धारकरी, शंभू व सर्जेराव यांजबरोबर देऊन मेव्हण्याची मोठ्या उत्साहानें रवानगी केली, हे दोन हजार व श्रीगोंद्याचे एक हजार मिळून तीन हजार स्वारांची एक आठ दिवस चांगली कवाईत घेऊन मालोजीनें श्रीगोंद्यासच डेरे दांडे बुणगे ठेवून तेथून सुमुहूर्तावर, श्री शंभुमहादेव व तुळजामाता यांच्या नांवाचा जयजयकार करून, कूच केलें. तो निंब-देहाऱ्याच्या घाटानें उतरून नेवाशावरून गंगातीरास येऊन दाखल झाला. तेथें पुष्कळ रानडुकरें जमा केलीं, आणि एकदम चढ्या घोड्यानिशीं ही स्वारी दौलताबादेनजीक येऊन ठेपली. तेथें तीं रानडुकरें

मारून त्यांच्या गळ्यांत निजामशहा पादशहास लिहिलेल्या अर्जाच्या चिठ्या बांधून तीं मेलेलीं डुकरें रात्रीं मशीदींत टाकिलीं, आणि रातोरात स्वारी परतून मुक्कामास गेली. अर्जातील मजकूर असा होता. " लखूजी जाधवराव देशमुख पाटील यांनीं आपली कन्या जिजाबाई आमचे पुत्र शहाजी यास देऊं केली. शिमग्याचे पोस्तांत हुजूर मजलसींत ( कन्या देतों) बोलोन स्त्रियांचे योगें बेइमानीस आले, आणि आह्मांस चाकरीवरून दूर केलें. काबिलेसुद्धां बाहेर घातलें. यास्तव आपण जगपाळराव निंबाळकर यांचा आश्रय करून माशि-दींत डुकरें मारून टाकिलीं. याउपर पादशहा आमची दाद घेऊन सोयरीक आह्मांस करून देववतील तर उत्तम. नाहींतर जेथवर पादशाहींत तुमच्या मशिदी असतील तित-क्यांत डुकरें मारून टाकितों. " *

सकाळीं मुजावर मशीदींत जाऊन पाहतात तों मेलेलीं डुकरें व त्यांच्या गळ्यांत चिठ्या बांधलेल्या असा मोठा चीड येणारा आणि अमंगळ व अपवित्र देखावा त्यांच्या दृष्टीस पडला. त्यांनीं तीं डुकरें व त्या चिठ्या दरबारांत दाखल केल्या. चिठ्या वाचून पाहतांच बादशहा फारच चिडला. त्यानें लखूजी जाधवरावास लगेच पकडून दर-बारांत आणण्यास सांगितलें. जाधवरावास जेवणावरून उठवून पुढें घालून दरबारांत आणण्यांत आलें. दरबारांत जाधवराव येऊन मुजरा करून उभे राहिले. बादशहानें त्या चिठ्या पुढें टाकून आणि तीं डुकरें दाखवून दरडा-वून सांगितलें कीं, ' आणिक कोणी असता तरी हत्तीखालें घालून मारतों. याउपरी मालोजी व विठूजी यांचा पुत्र

---

* मराठ्यांची छोटी बखर.

शहाजी यांस जिजाई देऊन लग्न करणें, आणि त्यांचें समाधान करणें. या गोष्टीस ढील केली तर ते दावा करतील तेव्हां मुलाजा होणार नाहीं.' अशी ताकीद होतांच जाधवराव घाबरला आणि ह्मणाला कीं, 'पादशहा अभय देतील तर विनंती करीन' त्यावर. बादशहानें अभय दिलें कीं, 'तुमचा मुद्दा असेल तो कबूल केला.' तेव्हां मुजरा करून जाधवरावानें अर्ज केला कीं, 'मालोजी व विठूजी यांचा पुत्र शहाजी यास आपली कन्या जिजाई पादशहांचे हुकुमावरून देतों, परंतु त्या दोघांस मनसब बारा हजार फौजेची द्यावी. कौल ( सनद ) देऊन सर्फराज केलें पाहिजे.' जाधवरावांची विनंति मान्य झाली.

शहाजी व जिजाबाई यांचें लग्न बादशाही थाटांत बादशहानें स्वतः करविलें. मालोजी प्यादयाचा फर्जी झाला!

---

## उपसंहार.

:o:

हें मालोजी भोंसले यांचें चरित्र यथाशक्त्या कादंबरीरूपानें संक्षेपतः वाचकांपुढें ठेविलें आहे.

यांतील रमा, शंभू, सर्जेराव, हैबतराव, सीताबाई आणि रामभट्ट यांजवरील व स्वतां मालोजी वगैरेवरील प्रसंग इतिहासांतील त्या वेळेच्या सामाजिक, धार्मिक, राजकीय वगैरे स्थितीचें हुबेहूब चित्र आहे. मालोजीनें आपल्या उदयार्थ ज्या साधनांचा उपयोग केला तीं साधनेंही त्याला त्या वेळच्या जवळजवळ अराजक स्थितीमुळेंच प्राप्त झालीं. १५८८ पासून १५९६ पर्यंत अहमदनगरास ५।६ क्रांत्या झाल्या. त्यापूर्वीही १५८० पासून

१६८८ पर्यंत विजापूरकर व अहमदनगरकर यांचा रोज झगडा चालू होता. रमा, शंभू वगैरेवर, तीं निंबाळकरासारख्यांच्या वर्गाचीं माणसें असतांनांही, घोर प्रसंग गुजरून त्यांची दाद न लागण्याचें कारणही बेबंदशाहीच. असो. केवळ आपल्या अंगच्या तेजानें व शुद्ध महत्वाकांक्षेनें आणि चातुर्यानें मालोजीराव एक पाटलाचा मुलगा आपल्या धर्मश्रद्धेच्या जोरावर ईश्वराच्या कृपेस पात्र होऊन असल्या विषम काळांतही प्रथम यःकश्चित् **प्याद्याची** नोकरी धरून शेवटीं **फर्जी** झाला. त्याला पुणें, सुपें, चाकण, शिवनेरी वगैरे किल्ले व प्रांतांची जहागीर मिळाली, बारा हजार स्वारांचा सेनापति, जाधवरावासारख्याची राजकुलांतील मुलगी त्याच्या मुलास स्त्री मिळाली, आणि भोंसले कुळाचा कायमचा अभ्युदय झाला. या शहाजी व जिजाबाई यांच्याच पोटीं सर्व महाराष्ट्रास स्वतंत्रता देणारा शिवाजी सुपुत्र जन्मास आला. आणि त्याच्या ह्मणजे मालोजीच्या नातवाच्या कारकीर्दीत मालोजीनें पुंड्यांस दिलेली पोतदारीची सनद खरी होण्याचा योग आला. किती दूरदृष्टि! केवढा स्वकृतीच्या चांगुलपणाबद्दल विश्वास! आणि महत्वाकांक्षा! स्वतः शहाजी राजेही ‘ भित्तीवांचून चित्रकर्म करणारा ’ असा अलौकिक मोहरा निपजला. त्यानें दक्षिणेची मुसलमान पादशाही आपल्या इच्छेनुरूप वाटेल तशी नाचविली. असो! तो सर्व प्रकार ईश्वरकृपा असेल तर आणि सांप्रतचें पुस्तक लोकांस आवडलें तर अशाच स्वतंत्र कादंबरीनें जगापुढें मांडण्याचा विचार आहे.

शेवटीं मालोजीसारखे पुरुष आमच्या भूमींत नेहमीं जन्मास येवोत अशी ईश्वराजवळ प्रार्थना करून, वाचकां-

नीं, विपत्काळींसुद्धां स्वधर्म, स्वाचार व स्वकुल जाति ग्राम, देश, राष्ट्र यांबद्दलचा योग्य अभिमान कसा पाळावा लागतो, महात्मे तो कसा पाळीत आले, आणि त्यांचा देशास केवढा उपयोग होतो हें लक्षांत चांगलें वागवावें असें सांगून वाचकांची रजा घेतों.

समाप्त.